# सातशे

## (वाचण्यासाठीचे एक नाटक)


लेखक: जयदीप चिपलकट्टी


अंक पहिला: पाने १-५८

अंक दुसरा: पाने ५९-९४


(२२ मे, २०२०)



संपर्क: jaydeep.chipalkatti@gmail.com

# सातशे
# (वाचण्यासाठीचे एक नाटक)

## अंक पहिला

**पहिला:** घे.

**दुसरा:** नको.

**पहिला:** घे रे.

**दुसरा:** नको.

**पहिला:** थोडीशी घे.

**दुसरा:** नको. थुंकायची पंचाईत होते.

**पहिला:** काहीसुद्धा पंचाईत नाही. मागे ओणवं होऊन दोन्ही चाकांमधोमध नेम धरून नि:शंकपणे पिचकारी मारायची. कुणी काही म्हणणार नाही, आणि तो रंग नंतर वेगळा उठूनही दिसणार नाही.

**दुसरा:** बरं, दे.

**पहिला:** घे. सुईच्या अग्रावर मावेल इतकीच दिली आहे.

**दुसरा:** (घेता घेता) रांडीच्या, तू असा वाह्यात बोलत जाऊ नको बरं! आजूबाजूला ऐकणारे खूप आहेत. हकनाक कुणाच्या भावना दुखावशील.

**पहिला:** हे पाहा, माझ्यावरचा स्नेह व्यक्त करण्यासाठी जर तू अपशब्द वापरणार असशील तर निदान पारिभाषिक चुका तरी करू नकोस. 'रांडीच्या' बरोबर नाही. मी रांडीचा नव्हे तर कांडीचा आहे. पैसे घेऊन संभोगासाठी शरीर देणं माझ्या आईला शक्य नव्हतं.

**दुसरा:** हो, आत्ता आठवलं. चुकलोच मी. तू म्हणतोस ते खरं आहे. दाती तृण धरून तुझी क्षमायाचना करायला हवी.

**पहिला:** नको! माझ्या आईला चावलास तर खराच रागावेन तुझ्यावर. पण आता थोडा वेळ विनोद स्थगित करूयात. दिलीय ती चाखून बघ.

**दुसरा:** (हुंगत) गोडमिट्ट वास आहे. मी काही ह्यातला दर्दी नव्हे, पण चांगल्या प्रतीची असावी.

**पहिला:** आहेच.

**दुसरा:** (कातरलेल्या सुपारीत मिसळून दोन्ही हात भरपूर चोळून फक्की मारत) पण तोंड अगदी कडूजार होतं बुवा.

**पहिला:** चांगल्या प्रतीची आहे असं मी म्हणालोच होतो. परिणाम अजून थोड्या वेळाने जाणवेल.

**दुसरा:** वाट पाहीन. ऐकलं आहे मी खूप, पण ह्या प्रांतात मला अनुभव बेताचाच आहे.

(यावर 'शू! ऐकू द्या हो जरा...' अशासारखे आवाज कुठूनकुठून येतात.)

**पहिला:** ऐकू काय द्या? सगळे एकजात मठ्ठ आहेत. इतक्या अंतरावरून ऐकू यायला ती काय गाईच्या गळ्यातली घंटा आहे?

**दुसरा:** पण किती वेळ चालणार आहे कुणास ठाऊक.

**पहिला:** किती वेळ चालणार आहे ते ठाऊक नाही, आणि नक्की काय चाललं आहे तेही ठाऊक नाही.

**दुसरा:** मला तशी घाई नाही. मी थांबायला तयार आहे.

**पहिला:** अर्थात मीही आहे, पण तरीदेखील एक ढोबळ अंदाज असलेला बरा.

**दुसरा:** विचारून पाहतो. (आजूबाजूला ओरडून) यादवांनो, काय चालू आहे ते काही कळतंय का?

(एक घोडेस्वार दौडत सामोरा येतो.)

**घोडेस्वार:** काही नीट समजत नाहीय, सेनाधिपती. मघाशी मी कोसभर पुढे जाऊन बघून आलो. थोरले गोपाळ अर्जुनाशी काहीतरी बोलताहेत. अर्जुनाने धनुष्य बाजूला फेकून दिलं आहे आणि तो गुडघ्यांत डोकं घालून नुसता बसून आहे.

**पहिला:** पण काय बोलताहेत ते ऐकू येत नाही?

**घोडेस्वार:** नाही, काही ऐकू येत नाही. सगळ्यांचा खोळंबा करून ठेवला आहे. सेनाधिपती, तुम्ही म्हणत असाल तर इथूनच एक बाण टाकून अर्जुनाचा प्रश्न सोडवतो. तसं करू का?

**दुसरा (= कृतवर्मा):** नको. धर्मयुद्धाच्या नियमांत ते बसत नाही.

**घोडेस्वार:** मग नाही करत. तुम्ही यादवांचे सेनापती आहात. हे नियम तुम्हाला जितके पक्के समजतात तितके मला अजून समजत नाहीत. पण मी प्रयत्न करत राहीन. हळूहळू मला ते पाठ होत जातील तसतसे आणखी चांगले समजत जातील.

**पहिला (= कृपाचार्य):** हे पाहा, आत्ताच्या प्रसंगी लागू होणारा नियम खूप सोपा आहे. रथातल्याने रथातल्याशीच आणि घोडेस्वाराने घोडेस्वाराशीच युद्ध करायला परवानगी आहे. अर्जुन रथात आहे आणि तू घोड्यावर आहेस. परस्परविरोधी सैन्यांत जरी असलात तरीदेखील तुम्ही थेट प्रतिस्पर्धी नव्हेत. सबब तुला त्याच्यावर बाण टाकता येणार नाही.

**घोडेस्वार:** समजलं.

(खट्टू होऊन धीम्या गतीने निघून जाऊ लागतो, पण थबकतो आणि वळून परत फिरतो.)

**घोडेस्वार** (कृतवर्मा आणि कृपाचार्य अशा दोघांनाही उद्देशून): आता विषय निघालाच आहे म्हणून विचारतो. हा एक नियम कळला, पण इतरही नियमांबद्दल मला राहून राहून शंका येतात. स्वस्थ बसवत नाही आणि लढण्याकरता मनाची पूर्ण तयारी झालेली आहे असं वाटत नाही. तुम्हाला विचारू का? तुम्ही दोघेही माझ्यापेक्षा मोठे आहात. तुमच्याशी बोलून फायदा होईल.

**कृपाचार्य:** तू विचार, आम्हाला ठाऊक आहे तेवढं आम्ही सांगू. पण तुझं मन अगदी निवळशंख होईल अशी अपेक्षा बाळगू नकोस. कारण शंका मलाही आहेत.

**घोडेस्वार:** तुम्हालाही आहेत म्हणजे मी काय परिस्थितीत असेन पाहा. पण म्हणूनच विचारून घेतो.

**कृतवर्मा:** मग चला तर. नियम डोळ्यांसमोर ठेवूनच बोलू.

(युद्धाच्या तयारीचा भाग म्हणून कुरुक्षेत्राच्या धुळीत लाकडी खुंट्या ठोकण्यात आल्या होत्या. दक्षिणोत्तर आणि पूर्वपश्चिम जाणारे लांबलचक सुंभ ह्या खुंट्यांना ताणून बांधून चौरसांची जाळी बनवण्यात आली. प्रत्येक चौरसाची लांबीरुंदी एक सप्तमांश कोस आहे. धर्मयुद्धाचे नियम जिच्यावर ठसठशीत अक्षरांत कोरलेले आहेत अशी दीड हात गुणिले दोन हात आकाराची सपाट दगडी फरशी प्रत्येक चौरसाच्या वायव्य कोपऱ्यात जमिनीलगत पुरण्यात आली. माणूस कुरुक्षेत्रात कुठेही असला तरीदेखील फार अंतर कापावं न लागता त्याला हे नियम संदर्भासाठी उपलब्ध व्हावेत, असा यामागचा हेतू आहे. सध्या दक्षिणायन चालू असल्यामुळे, नियम वाचत असताना माणसाचं तोंड उत्तरेकडे व्हावं अशी योजना आहे जेणेकरून दिवसाच्या कुठल्याही वेळी सूर्य डोळ्यांवर येऊ नये. फरशा लावण्याचं काम पुरं झाल्यानंतर अर्थातच आता खुंट्या आणि सुंभ काढून टाकलेले आहेत. यांपैकी सर्वांत जवळच्या फरशीकडे कृतवर्मा आणि कृपाचार्य आपापले रथ नेतात. घोडेस्वार त्यांच्या मागोमाग येतो. शिलालेख असा आहे - )

## धर्मयुद्धाचे नियम

(१) घोडेस्वाराने घोडेस्वाराशी, हत्तीवर बसलेल्याने हत्तीवर बसलेल्याशी, रथीने रथीशी आणि पदातिने पदातिशीच युद्ध करावे.

(२) वार करण्यापूर्वी प्रतिस्पर्ध्याला पूर्वसूचना द्यावी.

(३) वार करण्यापूर्वी प्रतिस्पर्धी तुल्यबळ आहे की नाही, आपल्याच वयाचा आहे की नाही, व हातघाईवर येण्याला आपल्याइतकाच उत्सुक आहे की नाही याचे भान ठेवावे.

(४) एखाद्याला शब्दांनी युद्ध खेळावयाचे असल्यास त्याला शब्दांनीच प्रत्युत्तर द्यावे.

(५) लढाईतून विश्रांती घेतेवेळी उभयपक्षांनी परस्परांशी स्नेहभावाने वागावे. एकमेकांना त्रास देऊ नये.

(६) जो दुसऱ्याबरोबर युद्धात गुंतला असेल किंवा गांगरलेला असेल किंवा पाठमोरा असेल अशास ठार मारू नये.

(७) ज्याचे शस्त्र नीट चालत नसेल किंवा चिलखत निकामी झाले असेल अशास ठार मारू नये.

(८) मैदान सोडून गेलेल्याला अथवा स्वत:च्या सैन्यगटातून बाजूला पडलेल्याला ठार मारू नये.

(९) गाडे हाकणारी किंवा शस्त्रांची वाहतूक करणारी माणसे, ढोल किंवा शंख वाजवणारी माणसे, तसेच ओझ्याची जनावरे यांच्यावर वार करू नये.

**३७-पश्चिम २२-दक्षिण**

**घोडेस्वार** (कृतवर्म्याला उद्देशून): सेनाधिपती, हे नियम बनवण्यात तुमचा सहभाग होता अशी यादवसेनेत बोलवा आहे.

**कृतवर्मा:** दोन्ही बाजूच्या सेनापतींनी एकत्र वाटाघाट करून ते बनवलेले आहेत. त्यात मीही होतो, पण नियमांतले सगळे कंगोरे मला माहित आहेत असा ह्याचा अर्थ नव्हे. आठपंधराजण मिळून एखाद्या गोष्टीला जेव्हा संमती देतात तेव्हा आपण कशाला संमती देतो आहोत याबद्दलच्या त्यांच्या कल्पना एकमेकांशी तंतोतंत जुळतातच असं नाही.

**घोडेस्वार:** हे नियम मोडणाऱ्याला शिक्षा काय आहे? मी वेगवेगळया अफवा ऐकलेल्या आहेत. काहीजण म्हणतात नुसती कानउघाडणी होईल, काहीजण म्हणतात तुरुंगात टाकतील, काहीजण म्हणतात पैशांचा दंड होईल तर काहीजण म्हणतात मृत्युदंड होईल.

**कृतवर्मा:** एकतर कुठला नियम कितपत मोडला यावर शिक्षा अवलंबून आहे. आणि अफवा म्हणशील तर त्या आम्ही सेनापतींनी मुद्दाम पसरवलेल्या आहेत. फायदा होतो म्हणून माणूस नियम मोडतो. पकडले जायची शक्यता किती आणि शिक्षा काय होईल हे त्याला आधी खात्रीने कळलं तर तो उजवा-डावा हिशेब करून नियम मोडायचा की नाही ते ठरवेल. तसा हिशेब करता येऊ नये म्हणूनच शिक्षा जाहीर केलेल्या नाहीत.

**घोडेस्वार:** आता कारण कळलं, पण ते मी इतरांना सांगत नाही. अफवा तशाच राहू देत. पण ह्या शिक्षा देणार कोण?

**कृतवर्मा:** कुणा सैनिकाने नियम मोडला तर त्याचा गणनायक त्याला शिक्षा करील. सैनिकाला जर ही शिक्षा मान्य नसेल तर तो वाहिनीनायकाकडे फिर्याद करू शकेल. त्यापुढे मात्र फिर्याद नाही. अर्थात गणनायकानेच आगळीक केली तर ते प्रकरण थेट वाहिनीनायकाकडे जाईल, किंवा वाहिनीनायकाने केली तर पृतनानायकाकडे जाईल. अशी ती चढण आहे.

आता असं पाहा की आपली कौरवसेना अकरा अक्षौहिणी आहे, म्हणजेच तिच्यात आठ हजार नऊशेदहा गणनायक आणि दोन हजार नऊशे सत्तर वाहिनीनायक आहेत. शिक्षा देताना किंवा फिर्यादीची दखल घेताना हे सगळेजण एकसारखे निर्णय घेणार नाहीत. इथेतिथे विसंगती उद्भवणारच, आणि ही चांगलीच गोष्ट आहे. न्याययंत्रणेत थोडासा गोंधळ असला तर तिचा वचक वाढतो. ती फार शिस्तशीर झाली तर गुन्हेगार तिचा फायदा घेतात.

**घोडेस्वार:** पण आता उदाहरणार्थ दुसरा नियम घ्या: वार करण्यापूर्वी प्रतिस्पर्ध्याला पूर्वसूचना द्यावी. समजा आपल्या सैनिकाने पांडवांच्या सैनिकावर पूर्वसूचना न देता वार केला. तर त्याला शिक्षा कोण देणार? आपला गणनायक की त्यांचा?

**कृतवर्मा:** दोघांपैकी कुणीही चालेल. जो लवकर हजर होईल तो किंवा ज्याला कमी काम असेल तो. पण असे प्रसंगच जितके तुरळक येतील तितके चांगले. ह्यात अडचण अशी की समजा शूरसेनाने धैर्यधरावर वार केला. ह्यात जर धैर्यधर दगावला तर तो वार पूर्वसूचना देऊन केलेला होता की नाही हे कसं सिद्ध करणार? तर संकेत असा आहे की शूरसेनाने धैर्यधराला पूर्वसूचना द्यावी, ती आपण दिलेली आहे हे आजूबाजूच्यांना ओरडून सांगावं आणि आपल्याला पूर्वसूचना मिळालेली आहे हे धैर्यधराने आजूबाजूच्यांना ओरडून सांगावं. इतकं झाल्यानंतरच धैर्यधर आणि शूरसेन हातघाईवर येऊ शकतात. ह्यामुळे नंतर वाद राहणार नाही.

**कृपाचार्य:** हाच धडा तिसऱ्या नियमालाही लागू आहे. म्हणजे हातघाईवर येण्यापूर्वी हे दोघे तुल्यबळ होते की नाही याची आजूबाजूच्यांनी खात्री करून घ्यायला हवी. कारण नाहीतर समजा शूरसेनाच्या हातून धैर्यधर मारला गेला तर ते दोघे तुल्यबळ नव्हते, धैर्यधर कमकुवत होता म्हणून मारला गेला असा विपर्यस्त अर्थ नंतर कुणीतरी काढू शकेल.

**घोडेस्वार:** मी गणनायक नाही हे एकूण बरंच आहे तर. कारण वाद झाला तर निवाडा करण्याचं काम माझ्या आवाक्यातलं वाटत नाही.

**कृतवर्मा:** तसं ते थोडंसं गुंतागुंतीचं आहे खरं. आता तिसऱ्या नियमाचंच पाहा. हातघाईला येण्याकरिता दोन सैनिक एकमेकांइतकेच उत्सुक आहेत का हे ठरवण्याचा प्रश्न आहे. आम्ही जेव्हा हा नियम बनवला तेव्हा एका सेनापतीने काढलेली शंका सांगतो. कौरवांकडच्या सरासरी सैनिकाला सोयीसाठी आपण शंभू म्हणू आणि पांडवांकडच्या सरासरी सैनिकाला पंचू म्हणू. आता असं समजा की शंभू हा पंचूपेक्षा लढायला जास्त उत्सुक आहे. ह्यामागचं कारण काहीही असेल; कदाचित आपली बाजू जास्त न्यायाची आहे असं कौरवांना वाटत असेल, पण ते महत्त्वाचं नाही. नियमाप्रमाणे हे दोघे एकमेकांशी लढू शकणार नाहीत. शंभूला पंचूपेक्षा जास्त उत्सुक प्रतिस्पर्धी शोधून काढावा लागेल, आणि शंभूपेक्षा उत्सुक असलेल्या कौरवसैनिकाला पंचूपेक्षा खूपच जास्त उत्सुक पांडवसैनिक शोधून काढावा लागेल. होता होता होईल काय की कौरवसेनेतल्या अनेकांना जोडच मिळणार नाही. आधीच आपली कौरवसेना संख्येने जास्त आहे. त्यात असं होऊ लागलं तर आपल्यातल्या निम्म्यांना बसूनच राहावं लागेल.

**कृपाचार्य:** ही अडचण आहे खरी. आणि अशीही शक्यता आहे की नुसतं बसून राहिल्यामुळे कौरवसैनिकांचे हात शिवशिवत जाऊन ते हातघाईला आणखी जास्त उत्सुक होतील, आणि याउलट लढाई करून करून पांडवांचं औत्सुक्य कमी होईल. यामुळे ही तफावत वाढतच जाईल.

**कृतवर्मा:** तर यावर दुसऱ्या एका सेनापतीचं म्हणणं पडलं की औत्सुक्य हे आपापल्या सैन्याच्या सापेक्ष मोजावं, म्हणजे शंभू आणि पंचू एकाच पातळीचे समजावेत. मग ते एकमेकांशी लढतील, आणि शंभूच्या दीडपट उत्सुक असलेला कौरवसैनिक पंचूच्या दीडपट उत्सुक असलेल्या पांडवसैनिकाशी लढेल. ही मोजणीपद्धतही चुकीची म्हणता येण्यासारखी नाही. आणखी एका सेनापतीचं मत पडलं की जर प्रतिपक्षातला सैनिक तितकासा उत्सुक नसेल तर त्याला शिवीगाळ करून चिथवावं आणि उत्सुक बनवावं. चौथ्या नियमात ही तरतूद केलेली आहेच. पण एकदा ह्या आडरानात शिरलं की खूप फाटे फुटतात. समजा एखाद्या सैनिकाला लढण्यात काही रस नाही. तर तो इतरांना चिथावून आपल्यापेक्षा खूप जास्त उत्सुक बनवू शकेल, जेणेकरून त्याला स्वत:ला कुणाशीच युद्ध करावं लागणार नाही. शेवटी आम्ही असं ठरवलं की युद्धाचे पाच दिवस लोटल्यानंतर परिस्थितीची पाहणी करून तिसऱ्या नियमाचा अर्थ निश्चित ठरवावा. युद्ध मार्गी लागल्यानंतर जे औत्सुक्य टिकेल ते खरं. आधीचं खरं नाही.

**घोडेस्वार:** एकूण एवढं कळलं की नियमाचा अर्थ लिहिल्यालिहिल्या निश्चित होत नाही. तो सावकाश उलगडत जाईल. पण असं सगळ्याच बाबतीत होऊ लागलं तर मूळ सेनापतींच्या मनात जे अर्थ होते ते बाजूलाच राहतील.

**कृतवर्मा:** म्हटलं ना, मूळचे अर्थ असे पक्के नव्हतेच. सगळ्या सेनापतींनी सगळ्या नियमांना हो म्हटलं असलं तरी प्रत्येकाला अभिप्रेत असलेला अर्थ थोडाथोडा वेगळा होता.

**घोडेस्वार:** ठीक आहे, शेवटी तुम्ही जसं म्हणाल तसं. मी काही एवढा हुशार नाही. पण आता एक सोपा प्रश्न विचारतो. ढोल किंवा शंख वाजवणाऱ्या माणसावर वार करू नये असं नवव्या नियमात लिहिलेलं आहे. पण उदाहरणार्थ तुतारी वाजवणाऱ्यावर वार केलेला चालेल असा याचा अर्थ नसणार.

**कृतवर्मा:** नाही, तसा अर्थ नाही.

**घोडेस्वार:** पण मग 'वाद्य वाजवणाऱ्यावर वार करू नये' असं सरळ का नाही लिहिलं?

**कृतवर्मा:** कारण नियम बनवताना कोणत्या परिस्थितीत माणसं तो पाळतात याचा विचार करावा लागतो. 'वाद्य' हा अमूर्त शब्द आहे. तो वाचून डोळ्यांत निश्चित असं चित्र उमटत नाही किंवा कानांत निश्चित असा आवाज उमटत नाही. 'ढोल', 'शंख' असे स्पष्ट शब्द वापरण्यामुळे मनावर नेमका परिणाम होतो. ह्यामुळे होतं काय की रणधुमाळीत असतानाही हा नियम लक्षात राहतो. अमूर्त नियम तितक्या ठाशीवपणे लक्षात राहात नाही. पण अर्थात तुतारीचा आवाज जरी ढोलासारखा किंवा शंखासारखा नसला तरी तिलाही तोच नियम लागू आहे. तेवढं तारतम्याने समजून घ्यायचं आहे.

**घोडेस्वार:** पण मला शंका अशी आहे. समजा कुणीतरी एका सैनिकाने - त्याला बलवंत म्हणू - एका तुतारीवाल्यावर वार केला. इतरांनी त्याला जाब विचारला तेव्हा बलवंत म्हणाला की तुतारीचा उल्लेख तुम्ही केलेला नाही तेव्हा तुतारीवाल्यावर वार करण्याची मला मुभा आहे. तर मग काय?

**कृपाचार्य:** मला वाटतं हा बचाव आपल्याला स्वीकारावा लागेल, आणि बलवंतला निर्दोष सोडावा लागेल. यामागचं कारण असं की अध्याहृत नियम लादता येत नाही.

**कृतवर्मा:** ते मान्य आहे, पण अशीही एक शक्यता आहे की ह्या घटनेनंतर तुतारीवाले, ढोलवाले आणि शंखवाले हे सगळेच बलवंतला वाळीत टाकतील. तसं झालं तर तो लढाई करत असताना आजूबाजूला वाद्यं वाजवून त्याला प्रोत्साहन द्यायला कुणी नसेल, आणि बलवंतला ह्याची टोचणी लागेल. ढोलवाले, शंखवाले आणि तुतारीवाले ह्यांच्यात आपापसांत एक आपुलकीची भावना असते. आपण सारे एक असं ते समजतात. तसं पाहिलं तर बलवंत हा शब्दश: अर्थ घेऊन चालणारा माणूस असल्यामुळे शंखढोलवाल्यांना त्याच्यापासून धोका नाही. पण तरीदेखील आपल्यातल्या एकावर वार म्हणजे आपल्या सर्वांवर वार असं त्यांना वाटू शकतं.

**कृपाचार्य:** आता यापुढे समजा बलवंतला तुतारीशंखढोलवाल्यांनी वाळीत टाकल्याची बातमी सर्वदूर पसरली. तर त्यानंतर नववा नियम जो कोणी वाचेल त्याला 'कुणाही वादकावर वार करू नये' हे अलिखित कलम आपोआपच दिसायला लागेल. पण ह्या नियमापुरतीच ही बाब मर्यादित राहणार नाही, तर सगळीच अलिखित कलमं आवर्जून लक्षात ठेवायला हवीत ही जाणीव मूळ धरू लागेल. तेव्हा एक तुतारीवाला मरेल कदाचित, पण लोकजागृती करून मरेल. जर तुतारीवाल्यांचा उल्लेख आधीच केला असता तर हा परिणाम झाला नसता. तेव्हा नियम मुद्दाम अर्धवट लिहिण्यातून कधी कधी फायदा होतो तो असा.

**घोडेस्वार:** हो, तेवढं मला आधीच समजलं होतं. सगळ्याच गोष्टी लिहिता येणार नाहीत. तसं करायला गेलं तर शिलालेख फार मोठा आणि किचकट होईल. पण आता तुम्ही अलिखित म्हणता त्यावरून विचारतो. सातव्या नियमात असं आहे की एखाद्याचं शस्त्र नीट चालत नसेल किंवा चिलखत मोडलं असेल तर त्याला मारू नये. शंखढोलाबरोबर तुतारी अलिखित आहे तसंच चिलखताबरोबर शिरस्त्राण अलिखित आहे असं मी समजतो. पण अशी कल्पना करा की शूरसेन आणि धैर्यधर ह्या दोघांची जुंपलेली आहे आणि शस्त्रं, चिलखतं वगैरे ठीकठाक आहेत. अशावेळी समजा शूरसेनाने धैर्यधराच्या चिलखतावर वार करून ते मोडलं. तर आता ताबडतोब लढाई थांबवायची असा त्याचा अर्थ होतो का?

**कृतवर्मा:** नाही. मी म्हणेन की त्यांनी जर सगळे नियम पाळून लढाईला सुरुवात केली असेल तर नंतर नियम मध्ये येणार नाही. कारण कुणाचं तरी शिरस्त्राण किंवा चिलखत निकामी झाल्याखेरीज तो मरणं अवघड आहे. निकामी या शब्दाचा अर्थच तो आहे. पण युद्ध जर केव्हातरी संपायला हवं असेल तर सैनिक मरणं त्यासाठी आवश्यक आहे, म्हणजेच केव्हा ना केव्हा तरी शिरस्त्राण आणि चिलखतं निकामी होणं आवश्यक आहे. तेव्हा नियमांचा अर्थ लावताना आपल्याला व्यापक उद्दिष्टं विसरून चालणार नाहीत.

**घोडेस्वार:** हे चांगलं सांगितलंत तुम्ही. हीच पद्धत मी सगळीकडे लावत जाईन. म्हणजे समजा शूरसेन आणि धैर्यधर युद्धाला तितकेच उत्सुक होते, आणि सगळे नियम पाळून त्यांनी लढाई सुरू केली. आता समजा धैर्यधराची पीछेहाट होते आहे, आणि म्हणून हातघाई चालू ठेवण्याबद्दलचं त्याचं औत्सुक्य कमी व्हायला लागलेलं आहे. अशा वेळी शूरसेनाने थांबायचं का? तर नाही. कारण युद्ध जर केव्हातरी संपायला हवं असेल तर सैनिक मरणं त्यासाठी आवश्यक आहे, आणि एखाद्याचा उत्साह कमी पडतो आहे हे काही त्याला न मारायला सबळ कारण नव्हे. तेव्हा इथेही एक मार्गदर्शक तत्त्व म्हणून व्यापक उद्दिष्ट उपयोगी पडतंच. बरोबर आहे ना माझं?

**कृतवर्मा:** अगदी बरोबर आहे.

**घोडेस्वार:** चिलखत आणि औत्सुक्य ह्या गोष्टींना एकमेकांची उपमा देता येईल हे माझ्या आधी लक्षात आलं नव्हतं. प्राचीन काव्यातल्या अनेक प्रतिमा अशाच आहेत. आपल्याला त्या ओढीवताणीव वाटतात, पण त्यांच्यामागे विचार असतो.

**कृतवर्मा:** हो ना! काव्यरम्यता आणि युद्ध यांचा संबंध जुना आहे.

**कृपाचार्य:** मी तर याहीपुढे जाईन. ही जी व्यापक उद्दिष्टं तुम्ही म्हणता ती नियमांचा अर्थ लावतानाच उपयोगी पडतात असं नाही. आपण नियमांचा गैरफायदा घेऊ नये याबद्दल दक्षता म्हणून सैनिकांनी ती सतत मनात ठेवायला हवीत. आता चौथ्या नियमाचंच पाहा. जर धैर्यधराला शब्दांनीच युद्ध करायचं असेल, म्हणजे प्रतिपक्षाला नुसती शिवीगाळ करायची असेल तर शूरसेनाने त्याला मारू नये, फक्त उलटी शिवीगाळ करावी असा तो नियम आहे. पण सगळेच सैनिक जर नुसती शिवीगाळ करू लागले तर कोणी मरणार नाही आणि युद्ध कधी संपणार नाही. तेव्हा शिवीगाळीला परवानगी जरी असली तरी ती अधूनमधूनच करावी. हे नियमांत जरी उघडपणे लिहिलं नसलं तरी व्यापक उद्दिष्ट आणि नियम ह्यांच्या संयोगातून स्पष्ट होतं.

**घोडेस्वार:** एकूण तुम्हाला प्रश्न विचारत गेलो ते बरंच झालं. सगळंच जरी नाही तरी पुष्कळसं कळलं. युद्धात एकदा पडलो की अनुभव गोळा होत जाईल आणि माझी समजही वाढेल. तसंच व्हायला पाहिजे. माझा अंदाज असा आहे की दोन्ही बाजूंचं सैन्य जसजसं घटत जाईल तसतसे आम्ही उरलेले सैनिक धर्मयुद्धाच्या नियमांत जास्त जास्त निष्णात होत जाऊ. गर्दी कमी होत गेली की विचार करायलाही पोषक वातावरण मिळेल. आजूबाजूला धांदल-धबडगा असला की काही सुचत नाही.

**कृतवर्मा:** आणि युद्ध नाहीच झालं तरी आपण केलेली चर्चा वाया जाणार नाही.

**कृपाचार्य:** बिलकुल वाया जाणार नाही. शब्दच्छल करण्याचा सराव कधी वाया जात नाही.

**कृतवर्मा:** ते ठीकच आहे, पण युद्धाचं काय होणार याबद्दलची अनिश्चिती संपवायला हवी. असाच वेळ जात राहिला तर सैनिक बिथरतील. त्यांना कधीतरी काहीतरी ठाम सांगून टाकावं लागेल: युद्ध होणार आहे की नाही?

**कृपाचार्य:** संजयला ठाऊक असेल. दूरवरचं दिसतं किंवा दूरवरचं ऐकू येतं असा कसलासा वर त्याला मिळाला आहे म्हणे. धृतराष्ट्राचा नोकर म्हणून सध्या त्याची नेमणूक आहे. धृतराष्ट्राला युद्धाची हकिकत सांगण्याचं काम त्याच्याकडे सोपवलेलं आहे.

**कृतवर्मा:** त्याला विचारून येऊ का? नाहीतरी इथे करण्यासारखं दुसरं काही नाही.

**कृपाचार्य:** त्याला घेऊनच ये.

**कृतवर्मा:** पण त्याच्या कामाचं काय?

**कृपाचार्य:** धृतराष्ट्राला सतत झोप येते. ती त्याची जुनी सवय आहे. युद्धाची हकिकत त्याला नंतर ऐकवली तरी चालण्यासारखं आहे. आपल्याला काही गोष्टी इतरांपेक्षा उशीरा सांगितल्या जातील ह्याची आंधळ्या माणसाला सवय असते.

**कृतवर्मा:** ठीक तर, मी संजयला घेऊन येतो. पण तू इथेच थांब. नाहीतर तुला शोधणं फार अवघड होईल.

**कृपाचार्य:** तू ये, मी जागचा हलत नाही. (समोरच्या शिलालेखाकडे निरखून पाहून) सदतीस पश्चिम आणि बावीस दक्षिण हा संदर्भबिंदू लक्षात ठेव. पण सांभाळून जा. गर्दी खूप आहे.

**कृतवर्मा:** गर्दी माझ्या लक्षात आलेली नाही असं तुला वाटतं का?

**घोडेस्वार:** माझा घोडा घेऊन गेलात तर बरं पडेल. गर्दी फार आहे. रथ सहजी नेता येणार नाही.

(घोडेस्वार घोड्यावरून उतरतो, आणि लगाम धरून अदबीने उभा राहतो. कृतवर्मा घोड्यावर मांड ठोकतो.)

**घोड्यावरून उतरलेला सैनिक:** संजय बहुतेक त्या दिशेला कुठेतरी आहे. (बोट दाखवतो.) आपलं यादवसैन्य पुष्कळ मागे आहे, तेव्हा कुरुक्षेत्राच्या सीमारेषेपासून आपण फार लांब नसणार. तुम्हाला घटकाभरापेक्षा जास्त वेळ लागू नये. नाहीतर रस्ता चुकलात असं समजा.

**कृतवर्मा:** आलोच. (घोडा दौडत दूरवर निघून जातो.)

**कृपाचार्य** (घोड्यावरून उतरलेल्या सैनिकाला उद्देशून): कौरवसेनेमध्ये यादवांचं स्थान विशेष प्रतिष्ठेचं नाही, हे सगळ्यांना ठाऊक आहे. खोचक शेरे मारून त्याची आठवण करून दिली पाहिजे असं नाही.

**सैनिक:** चुकलो. तसं काही माझ्या मनात नव्हतं. मी आपला सहज बोललो. पण यापुढे सैन्याची शिस्त पाळत जाईन.

**कृपाचार्य:** आता तू स्वत:च्या गणाकडे परत जा. निश्चित काही कळलं तर सैन्यात बातमी पसरवण्याची व्यवस्था आम्ही करू. तुझा गणक्रमांक काय आहे?

**सैनिक:** पंधरा हजार सातशे सोळा. घोड्याच्या गळपट्टीवर लिहिलेला आहे.

**कृपाचार्य:** तुझा घोडा मी नंतर पाठवून देईन. नीघ तू आता.

(सैनिक नमस्कार करतो आणि चालत निघून जातो.)



**कृपाचार्य** (स्वत:शीच): तजवीज पुरेशी आहे ना हे पाहावं. (कमरेची चंची काढून पाहतो, पण त्यात काही नाही.) हं! संपलेली दिसतेय. (आजूबाजूला आवाज देत) अरे, कुणाकडे शिल्लक आहे का रे थोडीशी?

(काहीजण आपापल्या चंच्या धुंडाळण्याचा अभिनय करतात, तर काहीजण त्या खरोखरीच धुंडाळतात. 'नाही, शिल्लक नाही. संपली आहे' अशी प्रत्युत्तरं येतात. 'साठा करून ठेवला पाहिजे. सीनूला बोलवा. तिच्याकडे असते.' असे आवाज जागोजागी निघतात. 'सीनू! सीनू! कुठे आहेस तू? सीनू!' अशासारख्या आरोळ्या सैन्यात पसरत जातात.)

(एक सैनिक दबक्या पावलांनी कृपाचार्यांजवळ येतो.)

**सैनिक:** नमस्कार, आचार्य.

**कृपाचार्य:** नमस्कार.

**सैनिक:** आपलं दर्शन घ्यावं म्हणून आलो. मी गणक्रमांक बहात्तर हजार तीनशे पंचावन्नमध्ये असतो.

**कृपाचार्य:** आहे का थोडी?

**सैनिक:** थोडा आहे. हा घ्या. (एक सुरई पुढे करतो.)

**कृपाचार्य:** थोडा आहे?

**सैनिक:** तुम्हाला आवडतो हे मला ठाऊक आहे म्हणून आणला. चांगल्या प्रतीचा आहे.

**कृपाचार्य** (वास घेत): सोमरस?! मला सोमरस आवडतो म्हणून तुला कुणी सांगितलं?

**सैनिक:** नाही, मला ठाऊक आहे. आपण घ्या. मी कुणाजवळ बोलायचा नाही.

**कृपाचार्य:** अरे, मी त्यातला नाही.

**सैनिक:** नाही, आपण घ्या. मी कुणाजवळ बोलायचा नाही. नंतर आणखीही आणून देईन. मी गणक्रमांक बहात्तर हजार तीनशे पंचावन्नमध्ये असतो.

**कृपाचार्य:** तुला काही हवं आहे का?

**सैनिक:** नाही, माझी काही अपेक्षा नाही. मेलेला माणूस तुम्ही जिवंत करू शकता असं ऐकलं, म्हणून दर्शन घ्यायला आलो. अपेक्षा काही नाही. युद्धात मेलेला माणूस स्वर्गात जातो, तेव्हा उगीच पुन्हा जिवंत कशाला व्हायचं? माणसाला घराची ओढ वाटली, बायकोची ओढ वाटली तरी अशा मोहांत त्याने अडकून पडू नये. तळहातावर शीर घेऊन लढावं. इथे आलो आहे तो मरायच्या तयारीने आलो आहे. नंतर मला जिवंत वगैरे काहीही व्हायचं नाही. घ्या, आपण घ्या.

**कृपाचार्य** (त्रासिक चेहरा करून): बाबारे, सोमरस आवडतो आणि मेलेला माणूस जिवंत करू शकतो तो शुक्राचार्य. मी कृपाचार्य. तो मी नव्हे.

**सैनिक:** असं होय! चुकलोच की. आता आम्हाला अक्षरज्ञान नाही. जे कानी पडतं त्यावर विसंबून राहावं लागतं. त्यात कधीमधी घोटाळा होतो. आणि गर्दी खूप आहे हो. चेहरे लक्षात ठेवायला अवघड जातं.

**कृपाचार्य:** मी कौरवांचा शिक्षक होतो. त्यांच्या बाजूने लढतो आहे. पण इथे कुणी ओळखत नाही. विद्वान

माणसाची किंमत सर्वत्र पूज्य असते अशी जी एक शब्दचमत्कृती आहे, ती असायला नको तितकी खरी आहे.

**सैनिक:** चुकलो म्हणतोच आहे. माफ करा. पण ते राहू द्या. आपण घ्या. (सुरई पुढे करतो.)

**कृपाचार्य** (चेहरा आणखी त्रासिक करून): बाबारे, मी त्यातला नाही! तो सोमरस तुलाच ठेव, आणि मरण्यापूर्वी सगळा संपवूनच मर.

(सैनिक ओशाळा चेहरा करून परत जातो.)

**कृपाचार्य** (स्वगत): मला सोमरस नको. बुद्धीला बथ्थड बनवणारा तो सोमरस मला नको. स्वसंतुष्टतेची लिबलिबीत साय मनावर लिंपणारा तो सोमरस मला नको. संपूर्ण त्रिखंडामध्ये सोमवर्मा आणि गोमवर्मा हे दोघेच माझे मित्र असल्याचा आभास उत्पन्न करून, मध्यरात्रीच्या किर्र शांततेत गळ्यांत गळे घालून आम्हाला रडायला लावून, दुसऱ्या दिवशी सकाळी तिघांनाही तिघांचीही घृणा वाटायला लावणारा तो सोमरस मला नको.

मला अफू हवी. बुद्धीच्या नागिणीला डिवचून फणा काढायला लावणारी अफू मला हवी. इंद्रियांचे निरोप हृदयापर्यंत पोहोचवणाऱ्या नीलरज्जूंमध्ये ताण भरून त्यांच्या झणत्काराने विचारशक्तीला खणखणून जाग आणणारी अफू मला हवी. पायात लटपट भरणारा सोमरस मला नको, तर मनाच्या वारूवरची मांड पक्की करणारी अफू मला हवी.

सोमरस हा अस्वस्थ पदार्थ आहे. शरीरातल्या ज्या द्रवाच्या सान्निध्यात तो येतो त्यामध्ये खळबळ आणि बंडाळी माजवल्याखेरीज तो राहात नाही. सोमरस रक्तद्रवामध्ये क्षोभ माजवतो, जेणेकरून नाक लाल होतं आणि माणसाचा विदूषक बनतो. सोमरस हा चंद्राचा अंश आहे. शरीरातल्या समुद्राच्या अंशामध्ये तो क्षोभ माजवतो, जेणेकरून माणसाला लघुशंकेची भावना होते. पण ऐंद्रिय संवेदनांची सोमरसामुळे अशी हबेलहंडी उडते की कितीही वेळा जरी ती केली तरीदेखील पुन्हा लागायची म्हणून राहात नाही. शरीरातल्या वीर्यद्रवामध्ये सोमरस क्षोभ माजवतो, जेणेकरून माणसाचा कामज्वर उफाळून येतो. परंतु कामज्वर शमवणारा अवयव हाच नेमका लघुशंका करणारा अवयव असल्यामुळे दोन जिभांनी केलेल्या ह्या दुहेरी आर्जवासमोर बिचारा गोंधळून जातो, आणि एकाग्रतेची ज्या वेळी सर्वाधिक गरज असते त्याच वेळी ती अशक्य होऊन बसते. कामक्रीडा जर करायची तर त्यासाठी इंद्रिय टक्क जागं असायला हवं, आणि हे

इंद्रिय कोणतं तर बुद्धी. पण सोमरस नेमका ह्या बुद्धीलाच गोंधळून टाकून तिचा ताठर कणा लेचापेचा करून सोडतो. आणि म्हणूनच मला सोमरस नको.

पण याउलट अफूची मातब्बरी पाहा! मनातल्या शक्तींचा ती संमेळ करते, जे विखुरलं आहे ते सुरचित करते, आणि ज्याचा क्षोभ झाला आहे त्याचं शांतवन करते. बुद्धीवरची अभ्रं अफूमुळे विरून जातात आणि प्रखर सूर्यप्रकाशाने मन न्हाऊन निघतं. सोमरसातला आनंद हा रेम्याडोक्याचा आनंद आहे, तर अफूतला आनंद हा बुद्धिमंताचा आनंद आहे. मी बुद्धिमंत आहे. मला अफू हवी.

हे माझ्या डोळयांनो! आईच्या हिरव्या पदरावर आशाळभूतपणे दृष्टी खिळवून असणाऱ्या तृष्ण बालकासारखे वायव्येकडे काय पाहता?! हिंदुकुश पर्वताच्या पायथ्याशी योजनगणती पसरलेल्या शिवारांत डोलणारे ते कोवळे लुसलुशीत हिरवे अमृतकुंभ तुम्हाला इथून थोडेच दिसणार आहेत? ते आहेत गांधारात आणि आपण आहोत भारतात. इथून ते खूप लांब आहेत. आणि इथेच जरी असते तरी काय उपयोग होता? ह्या घुमटदार स्तनांमधून जो चिकट दुग्धस्राव पाझरतो तो लगबग करून तसाच नाही काही चुरूचुरू पिता येत! दगडी कलशामध्ये ह्या पयोधरांना दोहून, सूर्यनारायणाच्या भाजऱ्या किरणांखाली त्यांच्यातला सारा भावनेचा ओलावा बाष्पीभवित करून टाकावा लागतो; आणि अशा प्रकारे तर्ककठोर बनलेला तो किरमिजी घनपदार्थ, चिंचोळया आणि धोकेबाज अशा खैबरखिंडीतून, तीन पापण्या असणाऱ्या बेदरकार उंटांच्या पाठींवरून वाहून इथपर्यंत आणावा लागतो, तेव्हा कुठे त्या आईच्या पदराआडची गोड माया ह्या कडवट हृदयाच्या कृपाचार्याला प्राशून घेता येते. पण हरकत नाही. अठरा अक्षौहिणींच्या गराड्यात सापडलेलं आणि हत्तीघोड्यांच्या लीदेने व सहबांधवांच्या विष्ठेने लिडबिडलेलं हे वास्तव इतकं असह्य आहे की थोड्याशा मायेला मी नाही म्हणणार नाही.

नको, मला सोमरस नको. काहीही लभ्यांश न देणाऱ्या एका युद्धासाठी, आयुष्यात एकदोनदाच लांबून पाहिलेल्या कोण्या राजाच्या हुकुमावरून घरदार सोडून देऊन माझे भोळे सैनिक इथे जमले आहेत. त्यांनी जरूर प्यावा तो सोमरस आणि जरूर साजरे करावेत ते कृतकवीरश्रीचे सोहळे, पण त्यांच्यात रमणारा मी नव्हे. सोमरस पिणाऱ्याचा आनंद हा कळपात राहणाऱ्याचा आनंद आहे, तर अफू घेणाऱ्याचा आनंद हा एकट्या माणसाचा आनंद आहे. कुरुक्षेत्राच्या ह्या कोलाहलात सत्तेचाळीस लक्ष तेवीस हजार नऊशे एकोणीस माणसांनी वेढलेला असताना मनातून मात्र मी एकटा आहे. आणि म्हणूनच मला सोमरस नको, अफू हवी.



('सीनू येते आहे! कुठे आहे? ती पाहा! सीनूला वाट सोडा! ह्या मातकट मैदानात आम्हाला मातेची ममता देणारी स्नेहाळ सीनू इकडेच येते आहे!' अशा आरोळ्या सैन्यात दूरवर जन्म घेऊन जवळ येऊ लागतात. लाकडाच्या हातगाड्याला चामड्याच्या वाद्या बांधून ओढत आणणारी लहान चणीची पण दणकट हाडापेराची एक स्त्री कृपाचार्यांच्या दिशेने येते आहे. तिचा गोल चेहरा नेहमी हसरा असतो. तिने घातलेल्या पिवळ्याधमक रेशमी झग्यावर शेंदरी रंगाची आग ओकणारे लांबलचक हिरवे साप चितारलेले आहेत. उंच, शेलाटा आणि खिन्न चेहऱ्याचा एक पुरुष तिच्या सोबतीला आहे. त्याचा डगला आणि पाटलोण दोन्हीही मंद निळ्या रेशमाचे आहेत. पुरुषाच्या चेहऱ्यावर असलेल्या भाजल्याच्या खुणा त्याने पांढऱ्या दाढीमागे लपवल्या आहेत.

चामड्याच्या वाद्या खांद्यावरून उतरवून सीनू त्या सोडून देते आणि कृपाचार्यांसमोर येऊन गाड्यापुढे उभी राहते. तिचे खांदे आपल्या लांबलचक बोटांनी अलगद दाबून धरत उंच शेलाटा माणूस तिच्या मागे येऊन थांबतो.)

**स्त्री:** नमस्कार, मी सीनू! आणि हा माझा खूप जुना मित्र मयाहुर. तुम्ही अडचणीत आहात असं कळलं.

**कृपाचार्य:** अडचणीत नाही, पण चणचणीत आहे. माझ्याजवळची अफू संपली आहे.

**सीनू:** काळजी नको! माझ्याकडे भरपूर आहे. गाड्यातली पुष्कळशी जागा मला तिच्यासाठीच राखून ठेवावी लागते. युद्धात इतकी भरभर खपणारी दुसरी वस्तू नाही. घ्या! (काळसर किरमिजी रंगाच्या चिकट पदार्थाची एक चौकोनी वडी त्याला आणून देते. तो कमरेच्या कशाचे बंद सोडू लागताच ती नम्रपणे 'नको' म्हणते.) तुमच्याकडून मी पैसे घ्यायची नाही. सैनिकांना किरकोळ वस्तू विकून मी पोट जाळते. अशा धंद्यात वरिष्ठांची मर्जी सांभाळावी लागते. तेव्हा तुमच्याकडून मी काही घ्यायची नाही. याला लाचलुचपत म्हणत नाहीत. याला जनरीत म्हणतात. अंगदेश असो, मद्रदेश असो की पांचालदेश असो, सगळीकडे ती एकच असते. घ्या!

(इतर सैनिक आजूबाजूला दाटी करू लागतात.)

(सैनिकांना) अरे, थोडा दम धरा. द्वाडपणा नका करू. सगळ्यांना देते. रीतसर रांग लावा पाहू. सैन्याला शिस्त हवी. हे बघा, माझा दर ठरलेला असतो. मी घासाघीस ऐकून घ्यायची नाही. सोन्यात देणार असाल

तर दोन माष आणि रुप्यात देणार असाल तर तीन शतमान असा दर एका वडीचा पडेल. तांब्यात देणार असाल तर रांगेच्या बाहेर व्हा. कुणाच्याही शिक्क्याची नाणी चालतील. अंगदेश असो, मद्रदेश असो, पांचालदेश असो की यवनदेश असो. धातूला किंमत आहे. त्याला द्राख्मा म्हणता की दिनार म्हणता ह्याला महत्त्व नाही. देश बदलतो तसे राजे बदलतात, पण धातू बदलत नाही. खरं नाणं दिलंत तर खरी अफू देईन, खोटं दिलंत तर टिर्रीवर फटका देईन. नाणं घेताना मी बघून घेते, वडी घेताना तुम्ही बघून घ्या.

(सीनू प्रत्येक सैनिकाकडून पैसे वसूल करते आणि आपल्या कमरेच्या थैलीत हात घालून सराईतपणे मोड देत जाते. पैसे मिळाले की एकेक सैनिकाला गाड्याजवळ मागे पाठवते. मयाहुर आता तिथे उभा आहे. प्रत्येक सैनिकाच्या हातात तो एकेक वडी ठेवत जातो.)

**सीनू:** सध्या मी माणसांसाठी देते आहे. घोड्यासाठी हवी असेल, हत्तीसाठी हवी असेल तर थांबा. त्यांच्या वड्या वेगळ्या आहेत. माणसाची वडी हत्तीला दिली तर फुकट जाते. हत्तीची वडी माणसाने खाल्ली तर धाडकन माणूस मरतो. आपापली शरीरप्रकृती असते. ती सांभाळायला हवी.

**कृपाचार्य:** बरीच कमाई केली आहेस.

**सीनू:** जमेल तितकी करते. माया विकून माया जमवते असं म्हणा!

**कृपाचार्य:** अफू सोडून आणखी कायकाय ठेवतेस?

**सीनू:** तसा नक्की नेम नाही. जे विकेल ते ठेवते. मला सीनू म्हणतात. उत्तरेला चीन नावाचा एक भलाथोरला देश आहे. तिथल्या भाषेत सीनू म्हणजे रेश्मा. चीनमध्ये मोठाले डोंगर आहेत, तिथून दऱ्याखोऱ्यांतून रस्ता खाली येतो आणि बख्तरमधून हिंदुकुश पर्वताच्या बाजूने निघून पुढे पर्सिकेपर्यंत जातो. महिनोनमहिने चाललं तरीदेखील संपत नाही. रेशीम वाहून नेण्यासाठी हा रस्ता तयार केला, म्हणून त्याचं नाव रेशीमरस्ता. तिथे माझा सततचा वावर असतो, म्हणून माझं नाव पाडलं रेश्मा. जे विकेल ते मी खरेदी करते, जे खरेदी होईल ते विकते. ह्या रस्त्यावर मिळत नाही असं काही नाही. खूप पैसे मिळतात आणि खूप शिकायला मिळतं. केव्हातरी काहीतरी जंमत हाती लागते. (गाडीकडे जाऊन एक चोपडं घेऊन येते.) हे बघा. मजेदार गोष्टी आहेत. विरंगुळा होईल तेव्हा वाचा.

**कृपाचार्य:** हे काय बाई?

**सीनू:** गोष्टी आहेत. एक राजा असतो म्हणे. त्याला पाच मुलगे असतात. पाचही ढड्डोबा असतात, म्हणजे राजा स्वत: किती हुशार असेल ते दिसतंच आहे. पण राजपुत्रच ढड्डोबा निघाले तर पुढे पंचाईत झाली असती. त्यांना शहाणं करायचं म्हणून तो एका साधूला बोलावतो. साधू काय करतो तर पोरांना गोष्टी रचून सांगतो. पहिल्या गोष्टीच्या पोटात दुसरी गोष्ट, दुसरीच्या पोटात तिसरी गोष्ट असा इब्लिसपणा तो मुद्दाम करतो. त्यामुळे झक मारत लक्ष द्यावं लागतं, नाहीतर मनात गोंधळ होतो. ढ राहून चालत नाही.

त्यांतली एक गोष्ट सांगते. एक गरीब बाई होती आणि तिचं पाळण्यातलं लहान मूल होतं. बाईने प्रेमापोटी एक अजगर पाळलेला होता. एकदा बाई पाणी भरायला गेली. आल्यावर बघते तर अजगर भलंमोठ्ठं पोट घेऊन अंगणात सुस्त लोळतो आहे. बाईला वाटलं की त्याने आपलं मूल गिळलं. तिला राग आला आणि डोक्यावरचा हंडा अजगराच्या तोंडावर फेकून तिने त्याला चेचून मारला. आत येऊन बघते तर मूल शांत झोपलं आहे आणि पाळण्याभोवती तरसाच्या पंजाचे ठसे आहेत. मुलाला खायला तरस आलेलं होतं आणि अजगरानं तरसाला गिळून मुलाला वाचवलेलं होतं. बाईला वाईट वाटलं आणि ती धाय मोकलून रडली. अविचाराने वागू नका अशी शिकवण यात आहे.

**मयाहुर:** शिकवण रास्त आहे. एकदा वस्तू गिळली की ती बाहेरून दिसत नाही हे अजगराला उमगायला हवं होतं. बाईला मूल आधी दिसेल आणि मग आपण दिसू इतकी दक्षता त्याने घ्यायला हवी होती.

('हा सुधारणेच्या पलीकडे गेलेला आहे' अशा आविर्भावात सीनू मयाहुराकडे पाहते. मयाहुर तिच्याकडे पाहून मंद हसतो.)

**सीनू:** आणखी एक अगोचर गोष्ट आहे. एका राजाला म्हणे मुलगी होते. पण तिला तीन अम्मे असतात. त्यामुळे तिचं लग्न होत नसतं.

**कृपाचार्य:** असं कसं होईल? मी तर म्हणतो की लग्न झटकन व्हायला पाहिजे. अधिकस्य अधिकं फलम्.

**सीनू:** चावट बोलू नका! अहो, तीन अम्मे असणं अशुभ असतं म्हणे. तर राजा दवंडी पिटतो की हिला बरं करील त्याला मी बक्षीस देईन. तर तिथून एक आंधळा आणि एक कुबडा चाललेले असतात. आंधळा काय करतो तर कुबड्याचे पाय धरून त्याला राजकन्येच्या मधल्या अम्म्यावर दाणकट आपटतो. त्या दणक्यानं कुबड सरळ होतं आणि अम्माही आत घुसून जिरून जातो. यानंतर राजाकडून बक्षीस घेऊन दोघेही

हिच्याशी लग्न करतात आणि सगळेजण सुखाने राहतात. आता तुम्हीच सांगा: असली गोष्ट ऐकून कुठल्या राजाचा कुठला मुलगा शहाणा होईल? तर तुम्हाला गंमत सांगत्ये. पहलवांच्या देशात हे पुस्तक मला मिळालं. पैसे देऊन मी त्याच्या प्रती काढून घेतल्या आणि बख्तरला जाऊन विकल्या. पाच वर्षांनी तिथे पुन्हा जाऊन बघते तो काय! सगळ्या गोष्टी लोकांनी बदलून टाकल्या होत्या. उंटाचा सिंह काय केला आणि मच्छीमाराचा शिंपी काय केला! मग मी नवीन पुस्तकाच्या प्रती काढून घेतल्या आणि उलट येऊन त्या पहलवांच्या देशात विकल्या. राजाचे पाच मुलगे बाजूलाच राहिले आणि मीच यातून शहाणी झाले. म्हटलं यात पैसा फार चांगला आहे. तर असेच सगळीकडचे लोक मनाला येईल तशा गोष्टी बदलत राहतात. नव्यानव्या घुसडतात, न आवडलेल्या वगळून टाकतात. मी आपली इकडचं तिकडे करते आणि सगळ्या बाजूंनी पैसे काढते. घ्या! मजा आहे.

**कृपाचार्य:** घेतो बाई! पण नंतर वाचतो. गोष्टी आवडल्या तर पैसेसुद्धा देईन. (चोपडं किंचित चाळून रथात काळजीपूर्वक ठेवून देतो.)



(संजय आणि कृतवर्मा येऊन दाखल होतात. संजय कृतवर्म्याच्या मागे घोड्यावर बसला आहे. दोघेही उतरतात. घोडा थकलेला आहे. जवळचा एक सैनिक घोड्याच्या गळपट्टीवरचा क्रमांक बघून त्याचा लगाम धरून हलक्या हाताने त्याला योग्य दिशेला घेऊन जातो.)

**कृतवर्मा:** हा घे संजय. कबूल केल्याप्रमाणे आणला आहे. पण खूप सायास पडले. मला आधी वाटला तितका तो जवळ नव्हता. वाट काढत जायचा प्रसंग असेल तर भोवताली अठरा अक्षौहिणींची गर्दी फार त्रासाची होते.

**कृपाचार्य:** अठरा कुठले? आपले अकराच आहेत.

**कृतवर्मा:** आपले अकरा आणि त्यांचे सात. धृतराष्ट्राचा हेका असा की कौरवसेना समोरून दिसली पाहिजे. संजयाला घेऊन तो पार पांडवसेनेच्या पाठीमागे जागा धरून बसला होता. त्यामुळे मला शत्रुसैन्यातूनही वाट काढत जावं लागलं. धर्मयुद्धाचे नियम माझ्या पथ्यावरच पडले, आणि त्यांनी कुणी मला इजा अशी केली नाही. नपेक्षा माझं नखसुद्धा शिल्लक राहिलं नसतं. पण शत्रूला घाणेरड्या शिव्या देणं याविरुद्ध धर्मयुद्धाचा कुठलाच दंडक नसल्यामुळे त्या मात्र सतत ऐकून घ्याव्या लागल्या. (आपल्या रथात जाऊन बसकण मारतो.)

**संजय:** नमस्कार कृपाचार्य! (अचानक मयाहुराला पाहून त्याला आनंद होतो.) अरे बाबा, तू इथे कसा?! कित्तीक वर्षांनी भेटतो आहेस. (त्याला घट्ट मिठी मारतो. मयाहुर फारशी प्रतिक्रिया देत नाही.) तू मला ओळखणं शक्य नाही, पण मी तुला बिलकुल विसरलेलो नाही! पांडवांसाठी तू जी मयसभा बांधलीस तिचा मोठा गवगवा झाला होता.

**मयाहुर:** त्याला सत्तावीस वर्षे झाली.

**संजय:** मी त्यावेळी अगदी पोरगेलासा होतो. मयसभेची स्तुती करणारं एक ऐसपैस कवन रचण्यासाठी पांडवांनी पैसे देऊन माझ्या वडिलांना बोलावलं होतं, तेव्हा त्यांच्याबरोबर मीही तिथे आलो होतो. तुझ्याकडे बोट दाखवून वडील मला म्हणाले की ह्या माणसाच्या जिवावर बेतलं होतं, पण तो मनाने धसकला नाही. सगळ्या जगाने तोंडात बोट घालावं अशी इमारत त्याने बांधून दाखवली. असं स्वत:चं कर्तृत्व पाहिजे. दुसऱ्यांची खुशामत करणारी गाणी गाऊन पोट जाळण्यात अर्थ नाही. पण शेवटी वडिलांनी केलं तेच मीही केलं.

**मयाहुर:** मी इथेतिथे हिंडलेलो आहे. माझं निरीक्षण असं की बांधल्यानंतर दोनतीनशे वर्षांच्या आत बहुतेक इमारती लढाईत सापडून जमीनदोस्त होतात. गाणी त्यापेक्षा जास्त टिकतात. तेव्हा तुझा निर्णय चुकला नाही.

**संजय:** पण त्या दिवसानंतर तू हरवलास तो आज दिसतो आहेस. खूप बरं वाटलं तुला बघून!

**मयाहुर:** मी भारतात क्वचितच असतो. मयसभेची प्रसिद्धी होत गेली तसतशी पैसा ज्यांच्याकडे फार झाला आहे अशा अनेक घराण्यांतून मला बोलावणी येऊ लागली. त्यांच्या एकापेक्षा एक अचाट लहरी सांभाळून मी राजवाडे, किल्ले आणि तुरुंग बांधत गेलो. चीन, गांधार, पर्सिके, तूर्किया, त्रुविशा आणि त्यापुढे समुद्रमार्गाने यवनांची बेटं आहेत तिथपर्यंत माझा वावर असतो.

**संजय:** पण पुन्हा इथे आलास हे उत्तम केलंस.

**मयाहुर:** मला विश्रांती कमीच घेता येते. सहा महिन्यांपूर्वी मला असा निरोप मिळाला की कुरुकुलातला वाद विकोपाला गेलेला आहे, वाटाघाटी फिसकटल्या आहेत आणि युद्धाची तयारी सुरू आहे. अठरा

अक्षौहिणी सैनिक आणि त्यांच्याबरोबरचे युद्धसाहाय्याला लागणारे इतरेजन ह्यांची अठरा दिवस राहण्याची, जेवणाची, खंदकांची, सांडपाण्याची आणि अंत्यसंस्कारांची व्यवस्था करण्याचं काम तू पत्करशील का अशी विचारणा मला करण्यात आली. मोबदला पुरेसा वाटला आणि इतक्या मोठ्या कामातून जो अनुभव पदरी पडेल तोही मोलाचा वाटला. त्याप्रमाणे मी प्रस्ताव स्वीकारला आणि पाच महिन्यांपूर्वी इथे येऊन दाखल झालो. काम खूप होतं, पण ते वेळेत पुरं करता आलं ही समाधानाची बाब आहे. व्यवस्थेत काही कसूर राहिली असेल तर मला तसं सांगा, जेणेकरून यथाशक्ती सुधारणा करता येईल.

**सीनू:** हा मला रेशीमरस्त्यावरच भेटला. युद्ध म्हटलं की माझी बरकत असते. तेव्हा आम्ही दोघे एकत्र इथे आलो. बिचाऱ्याचा काही त्रास नाही. गोड माणूस आहे. (संजयाला उद्देशून) नमस्कार, मी सीनू.

**संजय:** तुला कोण ओळखत नाही बाई? दोन्ही सैन्यांची भिस्त तुझ्यावर तर आहे.

**सीनू:** अहो, मला लाजवताय काय असे?! जमेल तेवढं करते.

**कृपाचार्य:** पण संजया, माझा प्रश्न असा की युद्ध होणार आहे की नाही? काय चालू आहे हे समजणं अवघड होऊन बसलं आहे.

**सीनू:** मी सांगते. मघा मी समोरून चालले होते, तर एक मोठा रथ मोकळ्यावर आलेला दिसला. रथातला माणूस मागे कोसळला होता. त्याचं अंग कापत होतं. धनुष्य हातातून घरंगळून खाली पडलं होतं. मला वाटलं की याला फेफरं आलं. माझ्या गाड्यात एक औषधी नेहमी असते. सांबरशिंग आणि जुनं चामडं एकत्र ठेचायचं. अथर्ववेदात लिहिलेलं आहे. नाकाखाली कुपी धरली की गुण येतो. तर ती घेऊन मी पुढे झाले, पण रथ चालवणारा माणूस म्हणाला की याचा काही उपयोग व्हायचा नाही. हे मनाचं फेफरं आहे. खाली पडलेल्या माणसाला तो काहीतरी सांगू लागला. काय चाललंय मला कळेना, पण काहीतरी महत्त्वाचं आहे एवढं कळलं. माझी आठ वर्षांची पोरगी आहे. तिला तिथेच सोडून आले. रथाच्या मागच्या दोन चाकांमधोमध तिला लपवली आहे. मी तिला म्हटलं, काही कळो न कळो, कोण काय बोलतंय ते भराभर लिहून काढ. नंतर बघू. त्याच्या प्रती काढून विकल्या तर चार पैसे मिळतील. काय करतेय बघूया.

**संजय:** बाई, आता मी सांगतो.

**सीनू:** सांग बाबा! मी गप्पच बसते कशी...

**संजय:** बाब अशी आहे की अर्जुनाची युद्ध करायला तयारी नाही. तो म्हणतो की विरुद्ध पक्षात माझे चुलतभाऊ आहेत, मला गुरुस्थानी असलेली कितीतरी मोठी माणसं आहेत. ह्या सगळ्यांबद्दल माझ्या मनात खूप प्रेम आहे. आणि म्हणून निव्वळ राज्य घशात घालण्यासाठी त्यांच्याविरुद्ध मी हत्यार उचलावं हे काही मला पटत नाही. अर्जुन फार खिन्न झालेला दिसतो आहे. आजारी असावा तसा वागतो आहे.

**कृपाचार्य:** मी पांडवांचा शिक्षक होतो. कुणात फार गुंतून पडावं हा माझा स्वभाव नव्हे, आणि शिक्षकाचा पेशा संपल्यावर माझ्या मनातून तो विषय संपला. पण तरीदेखील अर्जुन मला गुरुस्थानी मानतो हे ऐकून बरं वाटलं.

**संजय:** त्याने तुमचा नाव घेऊन उल्लेख नाही केला. भीष्म आणि द्रोण ह्या दोघांचा केला.

**कृपाचार्य:** इतक्या तपशीलात कशाला शिरायचं? ते दोघे मानाने मोठे आहेत म्हणून त्यांचा केला असणार, पण बाकीचेही त्यात आलेच. पण ते काही असलं तरी त्याला युद्ध करायचं नसेल तर माझा आग्रह नाही.

**सीनू:** मला अर्जुनाचं बरोबर वाटतं. आपल्याच भाईबंदांना मारायला माणूस कचरणं हे समजण्यासारखं आहे. युद्धावर माझं पोट आहे हे मी कबूल करते. पण म्हणून काहीही किंमत देऊन युद्ध होवो असं मी म्हणायची नाही. दोन्ही पक्षांत समझोता झाला तर चांगलं होईल. माझा माल काय तसाही खपेल.

**मयाहुर:** हे मलाही पटतं. ह्या युद्धाचा माझ्याशी असलेला संबंध बाकी कुणाहीपेक्षा निराळा आहे. युद्धाच्या पायाभूत सोयी करून देण्याचं काम कुरुकुलाने मला दिलेलं होतं, ते मी पार पाडलं. पैसे आधी मिळायला हवेत असा मी आग्रह धरला होता, कारण युद्धानंतर ते चुकते करायला कोण शिल्लक असेल याबद्दल निश्चिती नव्हती. त्याप्रमाणे ते मला मिळाले, तेव्हा माझी तक्रार नाही. पण सगळ्या सोयी जरी आत्ताच जागेवर असल्या तरीसुद्धा युद्ध एकदाचं सुरू झाल्यावर त्या पुऱ्या पडतील ना ह्याची शहानिशा करून घ्यायला हवी. फक्त ह्या कारणासाठी मला युद्ध पाहायचं आहे. एक शास्त्री म्हणून माझी प्रतिष्ठा माझ्या कामात गुंतलेली असते. ते माझ्या दर्जाला साजेसं हवं. पण मी इथे एकटा नाही. युद्ध झालं तर खूप माणसं मरतील आणि मेलेल्यांच्या आप्तेष्टांना खूप दुःख होईल इतकं उघड आहे. ते जर टळलं तर मला आनंदच होईल. माझं काम वाया गेलं तरी चालेल.

**कृतवर्मा:** हे पाहा, अर्जुन जे म्हणतो आहे त्यात मलाही तथ्य दिसतं. पण कौरव आपले भाऊ लागतात हे त्याला आज सकाळी कळलं का? आधी का नाही सांगितलं? शेकडो योजनं अंतरावरून आम्हाला इथे बोलावून घेऊन आयत्या वेळी सगळ्यांसमोर गळा काढायचा तो कशाला? द्वारकेहून अख्खं यादवसैन्य घेऊन मला इथे यावं लागलं. अतिशय कटकट झाली. माझे सैनिक म्हणजे मूळचे गुराखी आहेत. गवताळ कुरणांत बागडत जरी असले तरी त्यांची बुद्धी कुशाग्र म्हणता येण्यासारखी नसते. गावंढळ सवयी त्यांच्या रक्तात मुरलेल्या आहेत. गुरं सोडून देऊन झाडाखाली लोळून वाईट कविता करण्यात ह्यांची आयुष्यं वाया जातात. असल्या माणसांमधून मला सैन्यभरती करावी लागली. दोनचा पाढा ज्यांच्या कधी लक्षात राहिला नाही, त्यांच्यासमोर तीन गुल्म म्हणजे एक गण, तीन गण म्हणजे एक वाहिनी, तीन वाहिन्या म्हणजे एक पृतना असले हिशेब घोकावे लागले. असल्या मेंघळटांच्या पलटणी उभ्या करून त्यांना कुरुक्षेत्रापर्यंत फरपटत आणावं लागलं. तीन गुराखी एका दिशेने शिस्तीत चालताना कधी बघितले आहेत का तुम्ही? अतिशय ताप झाला. एवढं करून आम्ही इथे येऊन ठेपलो न ठेपलो, तर हा म्हणतो मला आता लढायचं नाही.

**कृपाचार्य:** तेवढं आता आपण समजून घ्यायला हवं. अनेकदा होतं असं माणसाचं. आपल्याला अमुक हवं आहे असं वाटतं, पण समोर आल्यावर ते नकोसं वाटतं. शत्रुपक्षात आपले भाऊ आहेत हे अर्जुनाला अर्थात ठाऊकच होतं. आणि त्यांच्याशी युद्ध करायचं म्हणजे त्यांना मारायचा प्रयत्न करायचा हेही ओघाने आलंच. पण एखादी कृती तर्काला जरी पटलेली असली तरीदेखील जी एक भावना त्या कृतीला चिकटून येते ती काहींना सहन होत नाही. आता असं पाहा: काही माणसांना उंदरांचा त्रास होतो आणि उंदीर पकडायला ते पिंजरा लावतात. पण पकडलेला उंदीर समोर दिसल्यावर त्याला जेव्हा पाण्यात बुडवायचा प्रसंग येतो तेव्हा काहीजण कचरतात. तर अशा वेळेला जो कचरत नाही त्याने कचरणाऱ्याला समजून घ्यायला हवं.

**कृतवर्मा:** पण हा दाखला मला पुरता पटलेला नाही. जो माणूस उंदीर पकडायला निघतो त्याने तो पकडल्यानंतर पुढे काय करायचं याबद्दल मनाची तयारी आधीपासूनच करायला हवी. तो बुडवताना आपल्याला वाईट वाटेल ही भावना मूळ निर्णय घेतेवेळीच हिशेबात धरायला हवी. तेवढं स्वत:चं मन स्वत:ला ठाऊक असायला पाहिजे.

**कृपाचार्य:** तू म्हणतोस ते खूप लोकांना हे जमत नाही. मनाच्या रचनेतलाच हा काहीतरी दोष असावा.

**कृतवर्मा:** पण अर्जुन आयत्या वेळी कचरला हेच मला खरं वाटत नाही. तुम्हाला कारण सांगतो. पांडवांच्या वनवासाचं तेरावं आणि शेवटचं वर्ष चालू होतं, तेव्हाचा हा प्रसंग आहे. हे पाचजण आपल्या बायकोसह

विराटाजवळ आसरा घेऊन गुप्तपणे राहात होते. त्यावेळी भीष्म, कर्ण, दुर्योधन आणि इतर काही कौरवांनी विराटाच्या राज्यावर हल्ला करून त्याच्या गायी पळवल्या. पांडवांना डिवचण्याचा बहुतेक त्यांचा हेतू होता. तो वाखाणण्यासारखा नव्हता हे मान्य, पण खरा मुद्दा पुढेच आहे. त्यावेळी वेष पालटून अर्जुन रथात चढला आणि कौरव मंडळींना युद्धात हरवून त्याने गायी परत आणल्या. आता गाईंचा कळप परत मिळावा म्हणून जर तो आपल्या भावांशी लढायला तयार झाला असेल, तर राज्य मिळावं म्हणून का नाही? एखादी गोष्ट लहान फायद्यासाठी करणं त्याला जर गैर वाटत नसेल तर तीच गोष्ट मोठ्या फायद्यासाठी करणं गैर का वाटावं हे मला कळत नाही. म्हणून म्हणतो की हे कारण मला पटत नाही. भावना ही गोष्ट पूर्णपणे तर्कात सामावली जात नाही हे मी तात्पुरतं मान्य करतो. पण तरीदेखील भावनेने निदान आपली स्वत:ची तर्कसंगती पाळायला नको का? उंदीर बुडवायचा नसेल तर नका बुडवू. पण पहिला पद्धतशीर बुडवून झाल्यानंतर दुसरा बुडवताना कचरण्यात काय अर्थ आहे?

**कृपाचार्य:** मुद्दा चांगला काढलास. पण कौरवांनी त्यावेळी त्याला न ओळखल्यामुळे कदाचित अर्जुनाच्या मनाची टोच कमी झाली असेल. काहीजणांना उंदीर बुडवताना वाईट वाटत नाही, पण मरण्याआधी उंदराने त्यांच्या डोळ्याला डोळा भिडवला तर मात्र वाटतं.

**सीनू:** बाई गं! केवढी ती चर्चा! उंदीर साध्या पाण्यात बुडवायचा की वाग्गंगेत बुडवायचा हे आधी ठरवा. मी काही एवढी हळुवार झाले नसते. टोपलीभर रेश्माचे किडे उकळत्या पाण्यात बुडवलेले मी इतक्या वेळा बघितले आहेत की माझं मन कठोर होऊन गेलं आहे.

**संजय:** सीनू, तुझ्या मनाला कुणी कठोर म्हणणार नाही. पण ते एक असो. हा विषय एवढ्यावर संपत नाही. युद्ध नको म्हणण्याचं दुसरंही एक कारण अर्जुनाकडे आहे. मला ते नीटसं कळलेलं नाही, पण त्याने कृष्णाला जसं बोलून दाखवलं तसंच तुम्हाला सांगतो. तो म्हणतो की जर मी माझ्या भावांना मारून टाकलं तर कुरुकुलाची पडझड होईल. पुरुष जर मोठ्या संख्येने मारले गेले तर कुलातल्या बायका वाईट नादाला लागतात. त्यांची कामवासना शमेनाशी होते आणि त्या बाहेरच्यांशी संग करू लागतात. अशातून वर्णसंकर होतो आणि हिणकस प्रजा निपजते. परिणामी सगळ्या बाजूंनी कुलाचं वाटोळं होतं.

**सीनू:** नुसता संग केला म्हणजे प्रजा होते असं नाही. मध्यंतरात खूप लटपटी करता येतात. पण हा विषय बायकांबायकांतला असतो आणि पुरुषांना त्याची नीट माहिती नसते. अर्जुनाचंही तेच झालेलं दिसतंय.

**मयाहुर:** तुझं म्हणणं काय आहे?

**सीनू:** माझं म्हणणं इतकंच की एकतर कामवासनेबद्दल बोला किंवा प्रजेबद्दल बोला. दोन्हींची गल्लत नका करू.

**मयाहुर:** आत्ताच्या घडीला आजूबाजूला फार लोक आहेत. निवांतपणा नाही. तेव्हा ह्या लटपटींबद्दल न बोललेलंच बरं.

**सीनू:** ह्या विषयावर माझ्याकडे एक छोटंसं पुस्तक आहे. पण ते विकण्यासाठी नाही. माझं मीच वाचून नडेल तिला मदत करते.

**कृपाचार्य:** पण अर्जुन जिथून सुसाट चालला आहे, तो रस्ता अंधारा आणि नागमोडी आहे. स्त्रीची कामवासना हा प्रांत पुरुषाला नुसता विचार करून माहित होण्यासारखा नाही. समजा एखाद्या बाईचा पुरुष युद्धात मारला गेला तर मनाला हादरा बसून तिची कामवासना कदाचित विझूनसुद्धा जाईल. निश्चित काय होईल हे त्या परिस्थितीतून गेलेल्या कुलस्त्रियांकडे बघूनच ठरवायला पाहिजे.

**सीनू:** काय होतं ते सांगते. कितीतरी लहानमोठी युद्धं मी पाहिलेली आहेत. घरचा पुरुष मेला तर बाईवर एकदम जबाबदाऱ्या कोसळतात. शेतीची कामं सांभाळावी लागतात, शिवाय पोरं वाढवावी लागतात. पैसे कमी पडतात. ओढाताण होते. त्यामुळे सुरवातीच्या दिवसांत कामवासना चांगलीच कमी होते. पण नंतर ती पहिल्या पातळीला आपसूक येते. अशा वेळी बाईला दुसरा पुरुष शोधावासा वाटला तर त्यात नवल नाही. पण हे सगळं जिच्यातिच्यावर अवलंबून आहे. काही बायका अशा असतात की घरचा पुरुष जिवंत असला तरीसुद्धा त्या बाहेर संग करतातच. तो मेलाच पाहिजे असं त्यांचं नसतं.

**कृतवर्मा:** पण बाहेरचा संग केल्यामुळे प्रजा हिणकस निपजेल हे मला पटत नाही. असं का होईल? म्हणजे अर्थात लटपटी न केल्यामुळे प्रजा निपजली तर. नाहीतर प्रश्नच नाही.

**कृपाचार्य:** मी कौरवपांडवांचा शिक्षक होतो, त्यामुळे मी कुरुकुल जवळून पाहिलेलं आहे. आमच्यापेक्षा श्रेष्ठ कुल दुसरं नाही असा त्यांचा गंड आहे. त्यांची दृष्टी अशी की कुरुकुलाबाहेरचे पुरुष हिणकस असतात, त्यांचं बीही हिणकसच असतं, आणि म्हणून प्रजाही हिणकस होईल.

**मयाहुर:** ठीक आहे, आपण वादासाठी असं गृहीत धरू की पुरु नावाचं दुसरं एक कुल कुरुकुलापेक्षा हिणकस

आहे. आता पुरुकुलातल्या पुरुषांनी जर कुरुकुलातल्या बायकांत बी टाकलं तर दोन्ही कुलांचा जो सरासरी दर्जा आहे तशी पुढची प्रजा होईल. यामध्ये पुरुकुलाचा उत्कर्ष नाही का होणार? एक कुल जरी खाली गेलं तरी दुसरं वर येईल. यात वाईट काही नाही.

**कृपाचार्य:** तसंही होईल कदाचित, पण इतरांच्या कुलापेक्षा स्वतःच्या कुलाबद्दल अर्जुनाला जास्त काळजी वाटणं साहजिक आहे.

**मयाहुर:** हो, तेही बरोबर आहे. पण वर्णसंकर झाला तर प्रजेच्या दर्जात फरक पडतो का हा मात्र अभ्यास करण्यासारखा विषय आहे. एकाच कुलातल्या दहा हजार बायका घेऊन त्यांतल्या पाच हजारांचा वर्णसंकर केला आणि बाकीच्या पाच हजारांना कुलातच फळवलं तर ह्या प्रजेची त्या प्रजेशी शेजारीशेजारी तुलना करता येईल. मगच कळेल. पण असा प्रयोग करणं अवघड आहे. अर्जुनालाही नक्की माहिती नसणारच, तो बहुतेक अंदाजानेच बोलतो आहे. पूर्वी यवनांचा एक तरुण राजा होता, तो पर्सिकेमधून पुढे बख्तरपर्यंत घुसला होता. त्यावेळी त्याचे सैनिक आणि स्थानिक लोक यांच्यात वर्णसंकर फार झाला. पण स्थानिक बायकांच्या राजीखुषीनेच तो दरवेळी झाला असं नाही. त्यातून झालेली प्रजा आता रेशीमरस्त्याच्या आसपास कुठेकुठे विखरून आहे. मी त्यांच्याबरोबर राहिलेलो आहे आणि ते लोक मला सरसकट हिणकस कधी वाटले नाहीत. याउलट शुद्ध कुलातले लोक हिणकसपणे वागलेले मला अनुभवाने माहित आहेत. पण माझ्या एकट्याच्या मतावर विसंबून चालायचं नाही. दोन्ही गट शेजारीशेजारी ठेवून पूर्वग्रह न बाळगता अभ्यास हवा. यात अडचण अशी असते की मोठ्या प्रमाणावर वर्णसंकर असा युद्धानंतरच होतो. आणि युद्धामुळे भोवतालची परिस्थिती इतकी बदलते की तुलना पार बिघडून जाते.

**कृतवर्मा:** ज्याला सवड असेल त्याने असा अभ्यास जरूर करावा, पण अर्जुनाच्या ह्याही आक्षेपात मला जीव दिसत नाही. वर्णसंकराबद्दल जर अर्जुनाचं इतकं वाईट मत असेल तर त्याने जन्माला यायला नकार द्यायला हवा होता. तो स्वतः वर्णसंकराचंच पिल्लू आहे. अर्जुन झालेला आहे तो कुंतीने इंद्राशी संग केल्यामुळे. इंद्र हा कुरुकुलातला मुळीच नव्हे. आता अर्जुनानेच हा विषय काढला म्हणून मी बोलतो आहे, नाहीतर त्याच्या आईच्या कामवासनेबद्दल मी आवर्जून मत द्यायला गेलो नसतो.

**कृपाचार्य:** काळजी करू नकोस. तो इथून खूप लांब आहे, त्याला काहीसुद्धा ऐकू जाणार नाही.

**सीनू:** मला काय दिसतं ते सरळ सांगते. अर्जुनाला युद्धात मरायची भीती वाटते आहे, आणि स्वतःजवळ त्याला ती कबूल करायची नाही. लपवाछपवी म्हणून तो कुलाची पडझड वगैरे अवांतर मुद्दे काढतो आहे.

त्याला म्हणायचं आहे ते इतकंच की युद्धात खूप माणसं मरणं ही वाईट गोष्ट आहे. आणि त्याने स्वत: मरणं ही आणखीन वाईट गोष्ट आहे.

**कृतवर्मा:** पण हे आधी नाही का सांगायचं?

**सीनू:** हो, ते बोललो आपण मघाशी, पण मी म्हणते राहू दे. निदान आत्तातरी सांगितलं ना? मी काय विचारते की ह्या अर्जुनाचं वय किती आहे?

**कृपाचार्य:** नक्की ठाऊक नाही, पण अंदाज करता येईल. लग्न झालं तेव्हा तो कोवळा होता, सोळासतराचा असेल. त्यानंतर एकदा युधिष्ठिर आणि द्रौपदी एकांतात असताना तिथे तो घुसला आणि प्रायश्चित्त म्हणून त्याला बारा वर्षं वनवासात जावं लागलं. परत आल्यानंतर युधिष्ठिर जेव्हा द्यूतात हरला तेव्हा आणखी तेरा वर्षं वनवासात जावं लागलं. सोळा अधिक बारा अधिक तेरा मिळून एक्केचाळीस झाली. मधली एखाददोन मिळून त्रेचाळीस समजा.

**सीनू:** मग साहजिक आहे. ह्या वयात पुरुषांना वाटतं की आपलं आयुष्य सगळं चुकलंच की काय. असं खूपदा झालेलं मी बघितलं आहे. मग त्यांना विरक्ती तरी येते, नाहीतर ते स्वत:चं पौरुष सिद्ध करायला जातात आणि काहीतरी आततायी करून बसतात. मी म्हणते विरक्ती आलेली जास्त चांगली. दुसऱ्यांना हानी पोहोचायची तरी टळते. तसंच काहीसं असावं. अर्जुनाला हे सगळं नकोसं झालं असावं, आणि स्वत:चा जीवही धोक्यात घालायचा नसावा. पण तसं थेट बोलून दाखवता येत नाही. म्हणून मग तो सुचतील ती कारणं देत सुटला आहे. तेवढं आपण समजून घ्यायला पाहिजे. कारणामागची कारणं म्हणतात ती बघितली पाहिजेत.

**कृपाचार्य:** पण हे आपण बोलून फायदा नाही. ती कृष्णाने बघितली पाहिजेत, कारण उपदेश करणारा तो आहे. त्याचं ह्या सगळ्यावर काय उत्तर आहे?

**संजय:** सुरवातीला तो अर्जुनाला म्हणाला की तू षंढपणा करू नकोस. तू लढवय्या आहेस आणि लढणं हे तुझं नेमून दिलेलं काम आहे, तेव्हा तू युद्धाला तयार हो.

**सीनू:** मी म्हणाले ते अगदी हेच. असल्या पुरुषांना कसं चिथवायचं हे बेरकी लोकांना बरोबर माहित असतं. शेवटी भरीला पडून ते हमखास आततायी वागून स्वत:चं पौरुष सिद्ध करायला जातात.

**संजय:** हो, पण अजून तरी अर्जुन बधलेला दिसत नाही. तो तसाच बसून आहे. त्यामुळे चर्चा आता फार भरकटली आहे. इकडचे तिकडचे खूपसे विषय एकत्र करून कृष्णाने मोठा काला केलेला आहे. आधी तो म्हणाला की प्रजापतीने देव आणि मनुष्य निर्माण केले. नंतर म्हणाला की माणसाने इंद्रियांचं दमन करायला पाहिजे. यापुढे अर्जुनाने त्याला विचारलं की योगी माणसाची लक्षणं काय आहेत, आणि कृष्णाने बऱ्याच तपशीलात जाऊन ती त्याला सांगितली. मला तरी ह्या सगळ्यांत सुसंगत धागा असा ओळखू येत नाही. आत्ताच्या घटकेला लढाई करायची की नाही हे ठरवण्यासाठी इतका पसारा घालण्याची गरज नव्हती. एकतर लढाई करून नंतर ही चर्चा करा, नाहीतर लढाई बरखास्त करून बाकीच्यांना घरी पाठवून मग करा. इतरांची अडवणूक कशाला करता?

**कृतवर्मा:** लढाई होईल असं मला वाटत नाही. का ते सांगतो. कृष्ण ह्या सगळ्यात अविचाराने घुसला असा माझा कयास आहे. पांडवांच्या वतीने तो कौरवांकडे शिष्टाई करायला गेला होता. त्यावेळी तो मुद्दाम ताणून धरून गुर्मीत बोलला, जेणेकरून शिष्टाई फसेल आणि युद्धाला तोंड फुटेल. पांडव जिंकले तर आपल्यालाही राज्यात वाटा मिळेल असं त्याचं गणित असावं. सीनू म्हणते आहे तशी पौरुष सिद्ध करायची उबळ त्यालाही आली असेल.

पण नंतर सगळा बेत फिसकटला. झालं काय तर हा म्हणे झोपला होता. तेव्हा दुर्योधन येऊन त्याच्या डोक्याशी बसला आणि युधिष्ठिर पायाशी बसला. कृष्ण झोपेतून उठला तेव्हा त्याला युधिष्ठिर आधी दिसला, आणि दुर्योधन नंतर दिसला. म्हणून त्याने आधी युधिष्ठिराला विचारलं की तुला काय हवं आहे? तर युधिष्ठिर म्हणाला की तू हवा आहेस. यानंतर त्याने दुर्योधनाला विचारलं की तुला काय हवं आहे? तर दुर्योधन म्हणाला की मला तुझी यादवसेना हवी आहे. त्यामुळे कृष्ण एकटा तिकडे गेला आणि यादवसेना कौरवांकडे आली. हा सगळा ठार वेडेपणा झाला. जर कौरव हरले तर ह्याचंच सैन्य खलास होईल, आणि द्वारकेला परत गेल्यानंतर मेलेल्या सैनिकांच्या बायका ह्याला आईमाईवरून शिव्या देतील. याउलट जर कौरव जिंकले तर ह्याचं सैन्य जिंकलं पण हा हरला अशी विनोदी परिस्थिती येईल. आपल्याच सैन्याला विरुद्ध पक्षासाठी लढायला पाठवणं ही चक्रमपणाची परिसीमा नाही का झाली? आणि कहर म्हणजे यादवसेनेचं नेतृत्व माझ्यावर लादून माझी कात्री करून ठेवली आहे. माझे सैनिक मला विचारतात की मोठे गोपाळ विरुद्ध पक्षात का आहेत? हा प्रकार काय आहे तो आम्हाला समजावून सांगा. आता काय कर्म समजावून सांगा?! मलाच तो समजलेला नाही. तेव्हा माझा धोशा हाच आहे. आम्हाला मोकळं करा. मनात राग न ठेवता आम्ही आपले घरी जाऊ. इंद्रियांचं दमन करत तुम्ही दोघे इथेच राहा.

**कृपाचार्य:** एक शंका अशी येते की समोर जे चाललं आहे ते पाचही पांडव आणि कृष्ण यांच्यामधलं साटंलोटं असावं. कृष्ण पेचात सापडलेला आहे हे त्यांना कळलेलं आहे, आणि अब्रू न गमावता त्याला युद्धातून बाहेर आणता यावं म्हणून अर्जुन धडपड करतो आहे. अर्जुनाने कच खाल्ल्यासारखं करायचं, कृष्णाने त्याला युद्धाला प्रवृत्त केल्यासारखं करायचं, आपला धीर होत नाही असं कबूल करून अर्जुनाने युद्धातून माघार घ्यायची, आमचा भाऊ लढत नसेल तर आम्हीही लढत नाही असं बाकीच्यांनी म्हणायचं आणि शेवटी कृष्णाने नाईलाज झाल्यासारखं दाखवायचं असा हा बनाव दिसतो. इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून सध्या ते दोघे वेळ काढताहेत.

**संजय:** मलाही तसं वाटतं, पण तरीदेखील एक गोष्ट मनात खुपते आहे ती बोलून दाखवतो.

**सीनू:** आता काय आणखी? 'मला का लढायचं नाही' ह्याचं अजून तिसरं एक कारण अस्तनीतून बाहेर काढलंन की काय?

**कृतवर्मा:** शक्य आहे. अर्जुन सव्यसाची आहे, त्यामुळे त्याला डाव्याउजव्या दोन्ही अस्तन्या तितक्याच सफाईने वापरता येतात.

**संजय:** नाही, तिसरं कारण नाही. मुद्दा वेगळाच आहे. मघाशी जे मी म्हणालो की कृष्णाने खूप विषयांना हात घालून फापटपसारा केलेला आहे, ते खरं आहेच पण नंतरचा भाग बुचकळ्यात टाकणारा आहे. कृष्ण म्हणतो की माझं वय सूर्यापेक्षा जास्त आहे. सूर्याला मी योग शिकवला होता, सूर्याने तो मनूला शिकवला आणि मनूने इक्ष्वाकूला शिकवला. तोच मी आता पुन्हा सांगतो आहे, म्हणून फापटपसारा आहे.

**सीनू:** काही कळलं नाही.

**संजय:** मलाही नाही. ही बोलणी तिकडे चालू असताना मी कृतवर्म्याच्या मागे घोड्यावर बसण्याच्या प्रयत्नात होतो, त्यामुळे नीट लक्ष दिलं नाही. द्यायला हवं होतं. पण त्यापुढे कृष्ण असंही म्हणाला की सगळ्या माणसांचा, जनावरांचा आणि वनस्पतींचा मी मालक आहे. दुर्जनांना ठार मारण्यासाठी आणि सज्जनांचं रक्षण करण्यासाठी मी अधून मधून जन्म घेतो. आता ह्याचा अर्थ काय घ्यायचा?

**कृतवर्मा:** काही अर्थ लागत नाही. तो द्वारकेचा राजा आहे इतपत मान्य आहे, पण सगळ्या माणसांचा मालक केव्हापासून झाला? आणि झाला असेल तर आम्हाला आधी सांगायचं नाही का?

**मयाहुर:** मीही तेच म्हणतो. इथून तीनशे कोसांवर तुम्ही खैबरखिंडीतून एकदा पलीकडे गेलात की तिथे ह्या कृष्णाचं नावसुद्धा कुणी ऐकलेलं नाही.

**संजय:** मालक म्हणजे गुलामांचा मालक किंवा शेतजमिनीचा मालक ह्या अर्थाने नव्हे. त्याच्या म्हणण्याचा रोख असा दिसला की निसर्गसृष्टीला आणि माणसांना त्याने निर्माण केलेलं आहे.

**मयाहुर:** केव्हा?

**संजय:** ते माहित नाही.

**सीनू:** हे काही पटण्यासारखं नाही. जर त्याने आपल्या सगळ्यांनाच निर्माण केलं असेल तर जाहीरपणे तसं स्वच्छ सांगितलं का नाही? अर्जुनाला एकट्यालाच का सांगतो आहे?

**संजय:** तेही माहित नाही.

**कृतवर्मा:** आणि मारायचेच होते तर दुर्जन तयार कशाला केले? खरोखरीच ह्या गृहस्थाच्या बोलण्यात बोलणं नसतं. घोळ न घालता काहीसुद्धा त्याला करता येत नाही.

**कृपाचार्य:** दुर्जन म्हणजे आपणच बहुतेक, कारण तो अर्जुनाला आपल्यालाच मारायला सांगतो आहे. तेव्हा दिसतं असं की वेळ जात नव्हता म्हणून त्याने दुर्जन तयार केले आहेत, आणि ते मारताना आणखी वेळ जावा, काम फार पटकन संपू नये, म्हणून आपलीच फौज दुर्जनांची मदत करायला विरुद्ध पक्षात पाठवली आहे.

**सीनू:** तुम्हाला काय वाटतं? काही कारणाने कृष्ण भ्रमिष्ट झाला नसेल ना? उन्हाचा तडाखा बसला असेल म्हणावं तर वातावरण तसं नाही. थंडीचे दिवस आहेत आणि सकाळ आहे.

**संजय:** म्हणजे कृष्ण म्हणतो आहे त्यातलं तुम्हाला कुणालाच काही खरं वाटत नाही? खात्री करून घेतलेली बरी. कारण खरं निघालं तर पंचाईत होईल.

**सीनू:** नाही, काही खरं नाही. तू उगीच घाबरू नकोस. तुम्हाला सांगते काय चाललंय ते. माझी पोर पाचेक वर्षांची असतानाची गोष्ट आहे. शेजारच्या एका पोराशी तिची घट्ट मैत्री झालेली होती, आणि त्या दोघांनी मिळून आपापसांत एक सांकेतिक भाषा तयार केली होती. काही शब्द नेहमीचेच होते, काही नवे बनवले होते, आणि काही नेहमीच्या शब्दांचा अर्थ बदलून टाकला होता. एकमेकांबरोबर ते तासनतास काही ना बाही बोलत राहायचे, पण तिऱ्हाईत माणूस ऐकू लागलं तर दुग्ध्यात पडत असे. कृष्णाचं आणि अर्जुनाचं मिळून तेच चालू आहे. प्रजापती, इक्ष्वाकू, इंद्रियदमन वगैरे त्यांचे आपल्या-आपल्यातले गंमतीचे शब्द असणार. संजय त्यांचं बोलणं चोरून ऐकून आपल्याला सांगेल हे त्यांना कुठे माहित आहे? ते आपले आपापसात मस्करी करताहेत.

**कृतवर्मा:** पण मग हा समोरचा खोळंबा किती वेळ चालणार आहे? निदान ते समजलं तरी बरं होईल.

**मयाहुर:** नक्की ठाऊक नाही, पण संजयची मदत झाली तर आपल्याला ठोकताळा बांधता येईल. ह्या युद्धासाठी तजवीज करत असताना काही बाबी माझ्या लक्षात आल्या आहेत. अठरा दिवस युद्ध चालावं असा तुमचा बेत आहे. सैन्य अठरा अक्षौहिणी आहे. एका अक्षौहिणीत २१८७० हत्ती, ६५६१० घोडे आणि १०९३५० पदाति असावेत असं तुम्ही नेमून दिलेलं आहे; ह्यापैकी प्रत्येक संख्येतल्या आकड्यांची बेरीज अठरा येते. थोडक्यात अठरा हा आकडा जिथे तिथे आणण्याचा तुम्हाला सोस आहे. हा शहाणपणा नव्हे. हा एककल्लीपणा झाला. शत्रूची ताकद काय आहे ह्याचा विचार करून कोणतं दळ किती हवं ते ठरवायचं असतं. मनात घट्ट धरलेला एकच एक आकडा चिवडत बसून नव्हे.

**कृतवर्मा:** तुझं म्हणणं मला शंभर हिस्से मान्य आहे, पण आम्ही सैन्यातले लोक असेच असतो. रूढीने जे चालत आलेलं आहे तेच आम्हाला बरं वाटतं. आणि असं पाहा: हा एककल्लीपणा तू म्हणतोस तो दोन्ही सैन्यांनी केलेला आहे. तेव्हा फिट्टंफाट होऊन कुठल्याच बाजूचा विशेष तोटा होणार नाही.

**कृपाचार्य:** पण ह्या सगळ्याचा रोख कुणीकडे आहे? यावरून वेळेचा हिशेब कसा करणार?

**मयाहुर:** सांगतो. तर माझा कयास असा आहे की ह्या रूढीच्या प्रभावाखालून कृष्णसुद्धा सुटणार नाही. ह्या दोघांचं जे काही बोलणं चालू आहे ते अठरा तुकड्यांत विभागलेलं असणार असं मी गृहीत धरून चालतो आहे. अर्थात इथून आपल्याला काहीच ऐकू येत नाही, ते फक्त संजयला येतं. म्हणून त्याची मदत हवी.

**संजय:** ठीक तर. (कानोसा घेतो.) हे जे तू तुकडे म्हणतोयस ते अध्याय आहेत. आत्ताच सहावा अध्याय

संपला आहे. आपल्या गृहीतकाप्रमाणे अजून बारा व्हायचे आहेत. तेव्हा आत्तापर्यंत जितका वेळ गेला त्याच्या दुप्पट आणखी लागेल असं समजूया का?

**मयाहुर:** ह्यापेक्षा जास्त नेमकं गणित करण्याचा प्रयत्न करू. ह्या अध्यायांमध्ये काय आहे?

**संजय:** अनुष्टुभ छंदांमधले श्लोक आहेत. त्रिष्टुभ छंदामधलेही आहेत, पण ते तुरळक आहेत.

**मयाहुर:** किती?

**संजय:** प्रत्येक अध्यायात वेगवेगळे आहेत. पहिल्यात ४६, दुसऱ्यात ७२, तिसऱ्यात ४३, चौथ्यात ४२, पाचव्यात २९ आणि सहाव्यात ४७ आहेत. पुढचं अर्थात माहित नाही.

**मयाहुर:** आत्तापर्यंतचे २७९ झाले. जर याच दराने पुढेही असतील तर एकूण २७९ गुणिले ३ म्हणजे ८३७ होतील. पण माझ्या मते प्रत्यक्षात तितके होणार नाहीत. अठरा भाग करायचेच असा जर हट्टाग्रह असेल आणि आपल्याला काय सांगायचं आहे ह्याचं नियोजन जर नीट नसेल तर हमखास सुरवातीचे भाग मोठे होतात. नंतर बोलायला फारसं उरत नाही, तेव्हा छोटे भाग करून प्रसंग साजरा करून न्यावा लागतो. जर शेकडा पंधरा ते वीसची घट धरली तर याचा अर्थ असा की ६७० ते ७११ यादरम्यान श्लोकांची संख्या येईल. गोळाबेरीज सातशे धरून चालू. एक श्लोक म्हणायला किती वेळ लागतो ते ठरवायला हवं.

**संजय:** मी एक म्हणून दाखवतो.

**मयाहुर:** थांब. (मयाहुर गाड्यात शिरतो आणि शोधाशोध करून एक तांब्या घेऊन बाहेर येतो. अणकुचीदार पात्याने त्याच्या आतल्या बाजूला ठराविक अंतरावर खुणा केलेल्या आहेत. तांब्याच्या तळाला असलेलं लहान भोक त्याने आपल्या तर्जनीने बंद केलं आहे. जवळच्या एका घोड्याजवळ जाऊन त्याच्या पार्श्वभागावर तो विशिष्ट पद्धतीने थापटतो. घोडा धार सोडू लागताच मयाहुर ती तांब्यात भरून घेतो.)

**संजय:** कृतवर्मा, तुझा इथे उपयोग होणार आहे. तू सतत यादवसेनेत वावरत असल्यामुळे द्वारकेतले लोक कसे बोलतात हे तुला माहित आहे. तशासारखा हेल काढून मी जे म्हणतो ते माझ्यामागोमाग म्हण.

**कृतवर्मा:** सांग.

**संजय:** हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्

**कृतवर्मा:** हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्

**संजय:** जित्वा वा भोक्ष्यसे महीम्

**कृतवर्मा:** जित्वा वा भोक्ष्यसे महीम्

**संजय:** तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय

**कृतवर्मा:** तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय

**संजय:** युद्धाय कृतनिश्चय:

**कृतवर्मा:** युद्धाय कृतनिश्चय:

**संजय:** आता हे सगळं पुन्हा एकसंध म्हण. (मयाहुराला खूण करतो.)

**कृतवर्मा:** हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम् जित्वा वा भोक्ष्यसे महीम् तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चय:

(कृतवर्म्याने श्लोक म्हणायला सुरुवात करताच मयाहुर तांब्याखालचं बोट दूर करून जमिनीवर धार पडू देतो. श्लोक संपताक्षणीच बोट पुन्हा धरतो आणि किती द्रव बाहेर गेला ते आतल्या खुणेने पाहतो. हे सारं चालू असताना भोवताली मोठा घोळका जमत आलेला आहे.)

**मयाहुर:** एक श्लोक म्हणायला तुला तीस लिप्त इतका वेळ लागला. असे सातशे श्लोक म्हणजे तीस गुणिले सातशे बरोबर एकवीस हजार लिप्त झाले. छत्तीसशे लिप्तांची एक घटका होते, तेव्हा - (खाली वाकून धुळीत आकडेमोड करीत) पाच पूर्णांक पाच सष्ठांश घटका होतात. यातल्या एक तृतीयांशापेक्षा थोडासा जास्त वेळ सरलेला आहे, ह्याचा अर्थ आणखी पावणेचार घटका पुढे आहेत असं समजा.

(आजूबाजूच्यांना एकदम वाचा फुटते. 'अजून पावणेचार घटका - अजून पावणेचार घटका' असे सार्वत्रिक उद्गार निघतात आणि मोठमोठ्या होत जाणाऱ्या वर्तुळातून सैन्यात पसरत जातात. अनेकजण रथातून उतरतात आणि आळोखेपिळोखे देत इकडेतिकडे फिरू लागतात. मैदानाच्या परीघालगत जे चर खणलेले आहेत तिकडे अनेकजण चालू लागतात. 'समोरच्यांना सांगायचं का?' असं कुणीतरी विचारतो. 'सांगा - त्यांनाही सांगा' असा ओरडा होतो, आणि लागलीच 'अजून पावणेचार घटका - अजून पावणेचार घटका' असे उद्गार पांडवसेनेतही पसरतात. उरलेला द्रव मयाहुर जमिनीवर ओतून देतो, आणि तांब्या गाड्यात परत ठेवून देऊन त्याच घोड्याच्या शेपटाला हात पुसतो.)



**सीनू:** पावणेचार घटका म्हणजे खूप वेळ आहे अजून. मी आपली इथेच बसते. कुणाला काही हवं झालं तर इथेच येऊ देत. (पायातल्या वहाणा काढून ठेवून युद्धाचे नियम कोरलेल्या शिलालेखावर ऐसपैस मांडी घालून बसते.) बाई गं! दगड चांगलाच गार पडला आहे.

**मयाहुर:** यांगझीमधून मी मुद्दाम मागवून घेतलेला तो ज्वालामुखी खडक आहे. अंगातली उष्णता तो शोषून घेतो. दगडाला स्पर्श करणारा अंगाचा भाग जितका जास्त तितकी जास्त उष्णता बाहेर जाते. त्यामुळे जरत्कारूपेक्षा रंभोरुला त्यावर जास्त गार लागेल.

**सीनू:** पुरे! उगीच माझ्या मांड्यांवर टीकाटिपणी कशाला करायची ती? (दगडाशेजारीच धुळीत फतकल मारून बसते.) पण संजया, तुला इतक्या दुरून ऐकू येतं ही बरीक मोठी सोय आहे.

**संजय:** तितकीशी मोठी नाही.

**सीनू:** अरे, तितकीशी मोठी काय नाही? तुला व्यासाकडून तसा वर मिळाला आहे ना?

**संजय:** हो.

**सीनू:** मी काय म्हणते ते ऐक. वर म्हणजे फायद्याचं कलम. नाहीतर त्याला वर म्हणायचं कशाला? हे बघ, माझी अफूची खरेदीविक्री सतत चालू असते. ह्या धंद्यात फार कटकटी आहेत. बख्तरमध्ये अफू पिकते. शेतकऱ्याकडून ती विकत घेऊन उंटांवरून वाहून न्यावी लागते. तिथे सगळ्या डोंगरदऱ्याच आहेत, आणि

रस्ते फार खराब आहेत. तेव्हा होतं काय की ह्या वस्तीत काय चाललं आहे त्याची त्या वस्तीला बातमी नसते. चार कोस ह्या दिशेला गेलं तर दीडपट भाव, चार कोस त्या दिशेला गेलं तर निमपट भाव असं असतं. अशा ठिकाणी दूरवरचं ऐकू शकणारं माणूस मिळालं तर ते फार किफायतशीर होईल. मी तुला भागीदारी देते. दोघे मिळून आपण सगळा धंदा काबीज करू. बघ, विचार कर. नाहीतरी भाटगिरी करत राहून तुझी भरभराट होणार नाही. आपलं चांगलं होईल तिकडे माणसाने जावं. आपल्यापाशी जे कसब आहे ते वापरून घ्यावं.

**संजय:** नाही, ते तसं नाही. मला असं तिन्ही त्रिकाळ दूरवरचं ऐकता येत नाही. कसं झालं ते सांगतो. युद्धात काय घडतं ते धृतराष्ट्राला समजून घ्यायचं होतं. आता तो आंधळा असणं ही अडचण आहे. पण तरीदेखील त्याला युद्धापुरतं दिसेल असा वर द्यायला व्यास राजी होता. पण धृतराष्ट्र म्हणाला की इतकी मोठी कत्तल झालेली मला पाहवणार नाही. त्यामुळे युद्ध स्वत: बघून त्याचं वर्णन धृतराष्ट्राला सांगायचं काम माझ्यावर येऊन पडलं. ह्यात मला आनंद काही नाही. पण बोलूनचालून मी राजेलोकांच्या आसपास घोटाळणारा, त्यांच्या सदिच्छेवर पोट भरणारा माणूस. नाही म्हणण्याचा पर्याय माझ्यासमोर नव्हता.

**कृपाचार्य:** पण तुला लांबचं ऐकू येतं की दिसतं की दोन्ही? वर नेमका काय आहे?

**संजय:** धृतराष्ट्राशेजारी मी उभा होतो. तेव्हा व्यास धृतराष्ट्राला उद्देशून म्हणाला की 'हा संजय तुला युद्धाचं वर्णन करून सांगेल. युद्धामध्ये त्याच्या अपरोक्ष असं काहीसुद्धा घडणार नाही. त्याला मी दिव्यदृष्टी देतो आहे, जेणेकरून तो तुला युद्धाचा वृत्तान्त सांगेल. त्याला सर्व काही कळेल, मग ते गुप्त असो की सुप्त, रात्री घडो की दिवसा. मनातले विचारही त्याला समजतील. त्याला थकवा येणार नाही, आणि शस्त्रं त्याला जखम करू शकणार नाहीत. युद्धातून त्याची जिवंत सुटका होईल.'

**कृतवर्मा:** म्हणजे हा वर तुला थेट न देता धृतराष्ट्राला परस्पर सांगून टाकला आहे.

**संजय:** त्याचं मला नवल वाटलं नाही. मी काय करावं हे इतरांनी आपापसांत ठरवलेलं आहे असं पुष्कळदा घडतं.

**सीनू:** चांगला घसघशीत वर आहे.

**संजय:** वर अगदी सढळ जिभेने दिलेला आहे, पण म्हणावा तसा मला धार्जिणा नाही. आता हेच पाहा.

युद्धाला सुरुवात झालेली आहे का? म्हटलं तर हो आणि म्हटलं तर नाही. शंख फुंकले गेलेले आहेत याचा अर्थ औपचारिक सुरुवात झालेली आहे, पण हातघाईला सुरुवात झालेली नाही. अर्धवट परिस्थिती आहे. पण ह्याचा वाईट परिणाम म्हणजे मला दिलेला वरही सध्या अर्धवटच लागू आहे. कृष्ण आणि अर्जुन तिथे काय बोलताहेत हे मी इथून ऐकू शकतो, पण अधलेमधले उच्चार पुसट आहेत. अंदाजाने अर्थ लावून सध्या मी सगळं लक्षात ठेवायचा प्रयत्न करतो आहे.

**कृतवर्मा:** तुला पुसट ऐकू येतं हे तू आम्हाला आत्ता सांगतो आहेस?

**संजय:** अंमळ पुसट.

**कृपाचार्य:** अंमळ म्हणजे किती ते मला ठाऊक नाही, पण मी म्हणतो जाऊ दे. नाही स्पष्ट ऐकू आलं तरी बिघडत नाही. संगनमत करून दोघे वेळ काढताहेत अशी माझी खात्री झालेली आहे. एकदाचं हे संपलं की युद्ध रद्द करतील आणि आपल्याला परत जाता येईल.

**संजय:** ते ठीक, पण हे दोघे काय बोलले ते धृतराष्ट्राला नंतर सांगावं लागेलच. म्हातारा खमक्या आहे. आणि माझी बिदागी त्याच्या मर्जीवर अवलंबून आहे. पण हे सोपं नाही. एकतर ऐकू नीट येत नाही, आणि शिवाय कृष्ण फार विस्कळीत बोलतो आहे.

**सीनू:** मग मी माझ्या पोरीला तिथे रथाखाली बसवली आहे ते चांगलंच झालं. एकदाचं हे संपल्यावर कृष्ण आणि अर्जुन कायकाय म्हणाले ते तू आठवून लिहून काढ. माझी पोरगी लिहिते आहेच. दोन्ही आपण ताडून बघू. मग त्याच्या प्रती काढून त्यातली एक धृतराष्ट्राला भेट देऊ. बाकीच्या खपवायचा पत्कर मी घेते. त्याचा अर्थ कसा लावायचा ते वाचणारे बघून घेतील. लोक बाकी कायकाय वाचतात ते एक नवलच आहे. काहीही लिहा, वाचणारे सापडतात.

**कृतवर्मा:** पण सीनूच्या मुलीने लिहिलं आहे ते आणि संजयला आठवतं आहे ते यात जर तफावत निघाली तर कुणाचं बरोबर ते कसं कळणार?

**संजय:** नाही ना कळणार. ती अडचण आहेच.

**कृपाचार्य:** आणि सातेकशे श्लोक म्हटले म्हणजे इथेतिथे तफावत ही निघणारच.

**मयाहुर:** अशा वेळी काय करायचं ह्याचं एक शास्त्र आहे. गणिताइतकं अचूक नाही, पण उपयोगाचं आहे. हे शास्त्र का शोधून काढावं लागलं ते सांगतो. बाबीलची वसाहत मागे सोडून पुढे दक्षिणेला गेलं की फिलेस्तान नावाचा देश लागतो. तिथे एक तरुण माणूस होऊन गेला. तो चक्रम होता पण स्वभावाने गोड होता. एके ठिकाणी तो फारसा राहिला नाही; गोष्टी सांगत एका गावातून दुसऱ्या गावात असा तो सतत हिंडत असे. नंतर त्याला कुणीतरी आकसाने मारून टाकला. त्याने कुठल्या गोष्टी सांगितल्या, तो कसा जगला ही हकिकत त्याच्या जवळच्या माणसांनी तो मेल्यानंतर काही वर्षांनी चामड्याच्या तुकड्यांवर लिहून काढली. फिलेस्तानच्या सगळ्या बाजूंनी समुद्र असल्यामुळे हे तुकडे दमट हवेने खराब व्हायला लागले. त्यामुळे त्यांच्या नव्या प्रती काढाव्या लागल्या, आणि त्याही नंतर कुठेकुठे नेऊन लोकांनी प्रतींवरून प्रती काढल्या. पण एकीवरून दुसरी प्रत काढणं हे काम कंटाळवाणं असतं, आणि लिहिताना चुका होतात. चुकीच्या प्रतीवरून नवी प्रत काढली की चुका वाढत जातात. तर असे चामड्याचे तुकडे आता खूप झालेले आहेत, आणि ते एकमेकांशी जुळत नाहीत. जागोजागी तफावत निघते. पण ह्या तरुण माणसाच्या बोलण्यात शहाणपण होतं असा लोकांचा विश्वास आहे, आणि त्यामुळे तो नक्की काय म्हणाला हे ठरवण्यासाठी खूप कष्ट घ्यायची त्यांची तयारी असते. आणि म्हणूनच, प्रती काढताना चुका का होतात आणि त्या दुरुस्त कशा करायच्या ह्याचं एक वेगळं शास्त्रच त्यांनी उभं केलं आहे.

**कृपाचार्य:** इथे आपल्यालाही ह्या शास्त्राची गरज पुढेमागे पडेलच. असं पाहा, कृष्ण आणि अर्जुन यांच्यामध्ये काय बोलणं होतं ते संजय लिहून काढणार आहे. आपल्याकडे चामड्यावर लिहिण्याची पद्धत नाही. भुजीच्या झाडाची साल काढून आपण त्यावर लिहितो. इथली हवा गरम असते, वाळवी असते, पाऊस पडतो, आणि ह्या सगळ्यामुळे झाडाच्या साली लवकर कुजतात. तेव्हा आपल्यालाही प्रतींवरून प्रती काढाव्या लागणारच, आणि कितीही काळजी घेतली तरी चुका होणारच.

**सीनू:** खरं आहे. मी तर म्हणते हे शास्त्रसुद्धा आपण लिहून काढायला पाहिजे. पण त्याच्याच प्रती काढताना चुका झाल्या तर काय घ्या?

**संजय:** हुशार आहेस हो बाई तू. तुझ्या तावडीतून काही सुटत नाही.

**सीनू:** पण मी म्हणते तसं तू सगळं लिहून तर काढ. आपण ते मयाहुराला दाखवू. त्याची नजर तिखट आहे. त्याला पटकन चुका काढता येतात.

**मयाहुर:** ह्या शास्त्राची मला खोलात जाऊन माहिती आहे असं मी म्हणत नाही. पण त्यातली काही तत्त्वं अशी आहेत की आपली आपण बुद्धी लढवून ती शोधून काढू शकतो. तुम्हाला एक किस्सा सांगतो. युद्धाचे नियम जेव्हा तयार झाले तेव्हा त्याचे शिलालेख बनवावेत आणि कुरुक्षेत्रावर ते ठराविक अंतराने लावावेत ही कल्पना माझी आहे. पण दगड खूप लागतात. तुम्हाला नेमकं सांगतो. कुरुक्षेत्र हे एक लंबवर्तुळ आहे. त्याचा मोठा व्यास तेरा कोस आहे, आणि त्याला काटकोन करून लहान व्यास नऊ कोस आहे. मोठा व्यास, लहान व्यास आणि तीनशे पंचावन्न अशा तीन आकड्यांचा गुणाकार करून त्याला चारशे बावन्नचा भाग दिला की लंबवर्तुळाचं क्षेत्र ठरतं. ही पद्धत मी यवनांकडून शिकलो. तर हिशेब असा होतो की कुरुक्षेत्र झाकायला एक कोस लांबीरुंदीचे ब्याण्णव चौरस लागतील. मी असं ठरवलं की संपूर्ण कुरुक्षेत्राचे एक सप्तमांश कोस लांबीरुंदीच्या चौरसांत तुकडे करून प्रत्येक चौरसाच्या वायव्य कोपऱ्यात एक शिलालेख लावावा. असे सुमारे साडेचार हजार शिलालेख मला तयार करून घ्यावे लागणार होते.

मूळ शिलालेख मी स्वत:च्या हाताने कोरून घेतला. बाकीच्या प्रती ह्या मूळ शिलालेखाची नक्कल करून बनवाव्या लागणार होत्या, पण इतके दगड आणि इतके पाथरवट एकाच ठिकाणी आणणं सोयीचं नव्हतं. त्यामुळे मी योजना अशी केली की मूळ लेखाच्या तीन प्रती काढून मैदानात त्या तीन ठिकाणी न्याव्यात. त्यातल्या प्रत्येकीवरून पुन्हा तीन प्रती काढून त्या आणखी दूर न्याव्यात आणि हा शिरस्ता असाच पुढे चालू ठेवावा. पण माझ्या लक्षात आलं की प्रतींवरून प्रती काढताना चुका होऊ लागल्या आहेत. चुकांचा अभ्यास म्हणजे मनाचा अभ्यास असतो. तुम्हाला उदाहरण देतो.

सहावा नियम असा आहे:

जो दुसऱ्याबरोबर युद्धात गुंतला असेल, गांगरलेला असेल किंवा पाठमोरा असेल अशास ठार मारू नये.

हे वाक्य आधी संपूर्ण पाठ करून मग फरशीवर कोरून काढायचं अशी आमची कामाची पद्धत होती. पण 'गुंतला' आणि 'गांगरलेला' यामध्ये तोच ध्वनी तीनदा येत असल्यामुळे पाठ चुकत असे आणि कित्येक पाथरवट 'गुंतला' ऐवजी 'गुंगला' लिहीत असत. ह्या दोन क्रियापदांचा अर्थ सारखा नाही. युद्ध करणारा पूर्ण तरतरीत मनाने ते करत नव्हता अशी जी अर्थछटा 'गुंगला' मध्ये येते ती नको आहे. त्यामुळे मी

गुंतला असेल किंवा गांगरलेला असेल

असा बदल केला. पहिला 'ग' आणि नंतरचे दोन 'ग' यांच्यात जास्त अंतर पडल्यामुळे ही चूक होईनाशी झाली. काम वाढलं पण त्याबद्दल तक्रार नाही. हे वाक्य आत्ता जसं आहे त्यात 'किंवा' ची विनाकारण पुनरुक्ती झाली आहे असं काहींना वाटतं. पण ती विनाकारण नाही.

अशी खूप उदाहरणं सापडतात. त्यांच्यातला सामाईक गुण कुठला हे ओळखून यवनांनी ह्या शास्त्राचा एक नियम बनवला आहे. तो असा की जर पाठभेद असेल तर जास्त आडनिडा पाठ हा बरोबर समजायचा, म्हणजेच जास्त सोपा पाठ चुकीचा समजायचा. कसं ते सांगतो: 'गुंगला असेल, गांगरलेला असेल' हा पाठ सोपा आहे कारण चार 'ग' मिळून म्हणायला सोपे होतात. पण याउलट 'गुंतला असेल, गांगरलेला असेल' हा पाठ आडनिडा आहे, कारण साऱ्या बाजूंनी 'ग' असताना मधला एक 'त' तगवून धरावा लागतो. यवनांचं म्हणणं असं की माणूस चूक करताना आडनिड्याचं सोपं करतो पण सोप्याचं आडनिडं करत नाही. म्हणून आडनिडा पाठ हाच खरा पाठ असायची शक्यता जास्त असते.

**संजय:** आडनिडा पाठ हाच खरा पाठ. नियम मजेदार आहे. मी आवर्जून लक्षात ठेवीन. कृष्ण आणि अर्जुन आपसांत काय बोलले हे मला नेमकं आठवेनासं झालं तर अर्धवट जे आठवतं आहे ते मुद्दाम आडनिडं करून लिहीन. लोकांना तेच खरं वाटेल. सीनूची मुलगी अजून कोवळी आहे, तिला वेगाने लिहिता येत नसणारच. ती आपलं सगळं सोप्पंसोप्पं करून टाकेल. म्हणजे जिंकणार मीच.

**सीनू:** तसं नाही हं. माझी पोरगी खूप झरझर लिहू शकते. भोवताली ऊन असो, पाऊस असो, गोंगाट असो, तिचं मन चळत नाही. ती आपली लिहीत जाते.

**मयाहुर:** हे खरं आहे.

**सीनू:** पोट राहण्याच्या वेळी बाईचं अंग जसं असतं तसं तिचं मूल होतं. त्या वेळी मी श्रीनगरीला एका तरुण संन्याशाबरोबर राहात होते. त्यानं स्वत: एकदाही कुणा बाईचा भोग घेतला नाही. पण त्याचा अभ्यास खूप होता. तो म्हणायचा की बाई आणि पुरुष जुगत असताना दोघांनाही त्यातून आनंद मिळायला हवा. इंद्रियांचं दमन करा असं कधी तो म्हणाला नाही. बायापुरुषांची बिनचूक मोजमापं घेऊन बायांचे किती प्रकार पडतात, पुरुषांचे किती पडतात, कुणाची जोडी कुणाबरोबर जमवली म्हणजे आनंद वाढतो ह्याचे त्याने ठोकताळे बसवले होते. मी खाली चिंचोळी आहे म्हणून मला तो हरणी म्हणायचा. माझ्यापेक्षा रुंद असलेली बाई म्हणजे घोडी, आणि खूप रुंद असेल तर हत्तीण. बाप्यांमध्ये जो खाली तोळामासा असेल तो ससा, त्यापेक्षा जाड असेल तो बैल आणि खूप जाडजूड असेल तो घोडा. नुस्ता आकार बघितला तर जुगण्याचे तीन त्रिकं नऊ प्रकार होतात. पण चिंचोळी विरुद्ध जाडजूड अशी जोडी असेल तर बाईला त्रास होतो. याउलट रुंद विरुद्ध तोळामासा अशी जोडी असेल तर बाईची खाज पुरती भागत नाही. पण हे सगळं नीट समजून घ्यायचं म्हणजे खूप प्रयोग करावे लागतात. तर असे वेगवेगळे पुरुष तो मला भेटायला घेऊन यायचा. जुगत असताना प्रत्येक क्षणी किती सुख होतं आणि किती त्रास होतो हे तो मला नोंद करून

ठेवायला लावत असे. आसन कुठलंही असो, डाव्या हातात तालपत्र आणि उजव्या हातात लेखणी धरून मी आपली लिहीत राहायची. खाली काहीही चालू असलं तरी मन चळू न देता लिहायची सवय मला तेव्हापासून लागली. त्याच दिवसांत कधीतरी मला पोट राहिलं. म्हणून माझ्या पोरीला जन्मापासून लिहिता येतं. दूध पीत असताना अम्म्यावर बोटांनी रेघा ओढायची तेव्हा मला शंका आली.

**कृतवर्मा:** एकूण ह्या संन्याशानं तुला बरंच सहन करायला लावलं.

**सीनू:** नाही, तसं नाही. मलाही मजा आली. ही सगळी माहिती एकत्र करून त्यानं नंतर एक पुस्तक लिहिलं. ते तर मी वारेमाप खपवलं. माझ्या पोरीला त्यातून सोन्याचे डूल घेतले. माझाही फायदा झाला आणि इतरांच्याही आनंदाची सोय झाली. एकूण पाहता माझ्या खाजगी रेशीमरस्त्याचा फार चांगला उपयोग झाला. तर सांगत काय होते की पोट राहतेवेळी बाईने आपलं अंग सांभाळायला पाहिजे. कारण मूल तसं होतं.

**कृतवर्मा:** तू म्हणतेस तसा अनुभव अनेकांना आलेला आहे. आमचा हा कृपाचार्य असा एकलकोंडा होण्यामागचं कारण तेच असावं.

**सीनू:** म्हणजे?

**कृतवर्मा:** त्याची जन्मकथाच तशी आहे.

**कृपाचार्य:** माझी जन्मकथा इथे जगजाहीर केलीच पाहिजे का?

**कृतवर्मा:** जगजाहीर नाही करत, पण तोंडी लावण्यापुरती सांगतो आहे. ती मनोरंजक असल्याबद्दल तुला कुणी दोष देणार नाही.

**कृपाचार्य:** ठीक आहे, सांग तर. पण फार रोखठोक शब्द वापरू नकोस.

**कृतवर्मा:** सांगायचं ते असं की शरद्वान नावाचा एक ऋषी होता. तो शस्त्रविद्येत तरबेज होत चालला होता, आणि त्यामुळे इंद्राला त्याची धास्ती वाटू लागली. शरद्वानाचं ब्रह्मचर्य मोडून काढण्यासाठी त्याने एक अप्सरा पाठवली. अप्सरेने शरद्वानासमोर येऊन आपले सगळे कपडे उतरवले आणि लांबून काही नखरे

करून ती परत गेली. इकडे शरद्वानाला राहवेना. एका पाणथळ जागेत रानगवत माजलेलं होतं तिथे तो लपतछपत गेला, आणि हाताने हलवू लागला. एकच गवताची कांडी वर आलेली होती, तिच्यावर नेमका शरद्वानाच्या पांढऱ्याचा फवारा उडाला आणि कांडी मधोमध सोलून निघाली. एका भागातून कृपाचार्य जन्माला आला आणि दुसऱ्या भागातून त्याची बहिण कृपी जन्माला आली. नेमक्या वेळी त्याची आई आपल्या मैत्रिणींपासून अशी फटकून राहिल्यामुळे कृपाचार्याच्या मनाचा कल जमावापासून वेगळं राहण्याचा झालेला आहे.

**सीनू:** बघा, मी म्हणत नव्हते?

**कृपाचार्य:** पण हे काहीच्या बाही स्पष्टीकरण झालं! माझा स्वभाव मी घडवलेला आहे. गर्भधारणेच्या वेळी माझी आई कशी वागली ह्याच्याशी त्याचा बादरायण संबंध कशाला जोडता?

**कृतवर्मा:** पाहिलंत?! म्हणजे फिरून फिरून आपण पुन्हा व्यासावर आलो. त्याचा ससेमिरा काही सुटत नाही. पण सीनूचा सिद्धान्त मला केव्हाचाच पटलेला आहे. धृतराष्ट्र आणि पंडूच्या आयांना तो ठाऊक असता तर आपल्यावर ही वेळ आली नसती.

**सीनू:** हा काय किस्सा आहे? इथे सगळ्यांना माहित आहे की काय? मी हिंडते खूप, त्यामुळे कुठे ना कुठे काही ना काही ऐकत असते. पण नेमक्या वेळी दुसरीकडे असले तर काहीतरी चविष्ट बातमी ऐकायची राहून जाते.

**कृतवर्मा:** तुला आणि मयाहुराला ही चित्तरकथा नवी असेल, पण इथे कित्येक वर्षे तो टवाळीचा विषय झालेला आहे. तू व्यासाला पाहिलं आहेस का?

**सीनू:** नाही.

**कृतवर्मा:** एकदा पाहिलंस तर पुन्हा पाहावंसं वाटणार नाही. त्याच्या दाढीचे केस डुकरासारखे राठ आहेत, आणि डोळे गुंजेसारखे तांबडेभडक आहेत. शिवाय अंगाला घाणेरडा वास येतो.

**सीनू:** मी एक चांगला साबण विक्रीला ठेवते. अंगाला वाईट वास असेल तर त्यानं लगेच जातो. मघाशी मी तुम्हाला तरुण संन्याशाबद्दल सांगितलं तो हे नेहमी म्हणायचा. पुरुषमाणसाने रोज दात घासावेत, आंघोळ

करावी, छान वासाचं तेल लावावं. नाहीतर बाईला किळस येते. काखेत घामाचा वास राहून गेला तर फार उबग येतो.

**कृतवर्मा:** तुला हकिकत ऐकायची असेल तर पुढे सांगतो. आमच्या भरतकुलामध्ये शंतनू नावाचा राजा होता, तिथून हे सगळं सुरू झालं. त्याची बायको सत्यवती. तिला चित्रांगद आणि विचित्रवीर्य नावाचे मुलगे होते. त्यांतला थोरला चित्रांगद लवकर वारला, आणि शंतनूनंतर विचित्रवीर्य गादीवर बसला पण तोही नंतर लगेचच वारला. विचित्रवीर्याला अंबिका आणि अंबालिका नावाच्या दोन राण्या होत्या, पण राज्याला वारस नव्हता. व्यास हा सत्यवतीचा आधीचा मुलगा. तिने त्याला बोलावून घेऊन सांगितलं की अंबिकेत तू बी टाक म्हणजे तिला मुलगा होईल. पण तो रात्री जेव्हा तिच्या खोलीत गेला तेव्हा त्याचा किळसवाणा अवतार बघून ती घाबरली आणि तिने डोळे घट्ट मिटून घेतले. व्यास तसाच तिला जुगला. त्यामुळे तिचा मुलगा आंधळा निपजला. तोच धृतराष्ट्र. आंधळा मुलगा राजा म्हणून चालत नसल्यामुळे सत्यवतीने व्यासाला पुन्हा बोलावून घेतला आणि अंबालिकेत बी टाकायला सांगितलं. त्याला बघून तिचा चेहरा फिकट पडला, म्हणून तिचा पोरगा पंडुरोगी झाला.

**सीनू:** काय अभंड गोष्ट आहे! पण माझ्या धंद्याला उपयोग होईल. एकेक गबाळग्रंथी बाप्या गाठून त्याला सांगते की हा वस्तरा घे, साबण घे आणि स्वच्छ राहात जा. नाहीतर बायकोला किळस येईल आणि तिला आंधळं पोरगं होईल. धंद्याचं असंच असतं. आपल्याला काय पाहिजे ते लोकांना नीट माहित नसतं. थोडं घाबरवलं की आपसूक विकत घेतात. आता व्यास हा मोठा माणूस. त्याला साबण विकायची माझी टाप नाही. पण माझ्यासारखीचं आधीच ऐकलं असतं तर चांगलं झालं असतं. धृतराष्ट्राची पोरं आणि पंडूची पोरं यांच्यात हेवेदावे झाले नसते आणि हा एवढा मोठा युद्धाचा डांगोरा वाजला नसता.

**मयाहुर:** यहुदी लोकांत ही चाल आहे हे मला माहित होतं. त्यांच्यात मोठा भाऊ मेला तर लहान भावाला त्याच्या विधवेचा भोग घ्यावा लागतो. भारतात पूर्वी कधी असं ऐकलं नव्हतं. पण व्यास हा सत्यवतीचा आधीचा मुलगा कसा हे मला समजलं नाही.

**कृतवर्मा:** सत्यवती ही पूर्वी कोळीण होती. ती एकदा पराशर ऋषीला बोटीतून यमुनेच्या पैलतीरावर घेऊन चालली होती. सत्यवतीला बघून तो पाघळला आणि त्याने तिला जोराचा आग्रह करकरून बळेच जुगायला तयार केली. ती बिचारी भेदरली होती, पण पराशर तिला म्हणाला की तुझ्या अंगाला जो माशांचा घाणेरडा वास येतो आहे तो घालवून तुला चांगला वास येईल अशी मी व्यवस्था करीन. त्याखेरीज तुझी फाटलेली योनी मी पुन्हा दुरुस्त करीन, म्हणजे तू नंतर दुसऱ्याशी लग्न करायला मोकळी

राहशील. एवढ्या आमिषावर ती तयार झाली. पराशराने बोटीत अंधार केला आणि तिला तो जुगला. त्याचीही ती पहिलीच वेळ होती, त्यामुळे सगळं पटकन झालं. सत्यवती गरोदर राहिली आणि तिला जो मुलगा झाला तो व्यास. माशांचा वास तिच्या कातडीवरून उडाला खरा पण पिशवीतून गेलेला नसल्यामुळे व्यासाच्या अंगाला अजूनही येतो. सत्यवतीने नंतर शंतनूशी लग्न केलं, पण आपला पूर्वेतिहास त्याला सांगितला नसावा.

**कृपाचार्य:** अंगाचा वास आईकडून आलाही असेल. पण समोरची बाई गर्भगळित झाली तरी आपलाच हेका दामटणं हा गुण थेट बापाकडून आलेला दिसतो आहे.

**संजय:** व्यास हा इतरांची तमा बाळगणारा माणूस नव्हे. आता माझंच पाहा: जर धृतराष्ट्राला युद्धाचं वर्णनच हवं असेल तर डोळ्यांनी बघून ते मी करू शकतो. त्यासाठी मला लांबचं दिसायला हवं आणि लांबचं ऐकू यायला हवं इथपर्यंत ठीक आहे. पण 'मनातले विचारही त्याला समजतील' हा जो वर मला न मागता दिलेला आहे, त्याची काहीसुद्धा आवश्यकता नव्हती. आणि तोदेखील नीट लागू पडत नाहीच. ही गुंतागुंत व्यासाने निष्कारण वाढवून ठेवली आहे.

**कृपाचार्य:** मी तुला हे विचारणारच होतो. इतरांच्या मनातले विचार तुला नेमके समजतात तरी कसे?

**संजय:** म्हटलं ना, नेमके समजत नाहीत. फार निसटते समजतात.

**सीनू:** पण तरीदेखील हे होतं कसं? बघायला डोळे असतात, ऐकायला कान असतात तसं मन समजायला काय असतं?

**कृतवर्मा:** माहित नाही. पण ह्याच्या उलट्या टोकाकडून पाहायला हवं. ऐकण्यासाठी आवाज हवेत असतो, बघण्यासाठी वस्तू प्रकाशात असते, तसं मन कुठे असतं हे माहित नाही. तिथून सुरवात करायला हवी.

**मयाहुर:** मला काय वाटतं ते सांगतो. मन हृदयात असणार इतकं उघड आहे. कान, नाक, डोळे, हात, पाय अशा सगळ्या अवयवांतून हृदयाकडे रक्त जातं. अवयवांत ज्या संवेदना उमटतात त्या हृदयाकडे नेण्याकरता ते असणार, कारण नाहीतर वीसपंचवीस फुलपात्रं भरून हा लाल द्रवपदार्थ अंगात सगळीकडे असायचं काहीच कारण नाही. मला जेव्हा समोर घोडा दिसतो तेव्हा डोळ्यातून त्याचं चित्र आणि कानातून त्याचा आवाज हे दोन्ही रक्ताबरोबर हृदयाकडे जातात. हृदयात हे दोन प्रवाह एकत्र येतात

आणि घोडा खिंकाळलेला मला कळतो.

**सीनू:** पण रक्तात जर संवेदना असतील तर सांडलेल्या रक्तात त्या दिसत का नाहीत?

**मयाहुर:** त्या दिसत नाहीत याचं मला आश्चर्य वाटत नाही. रक्त दाट आणि चिकट असतं, तेव्हा त्या सहज कुठेही लपत असतील.

**कृपाचार्य:** इथपर्यंत मला बरोबर वाटतं. समजा जखम होऊन अंगातलं पुष्कळ रक्त निघून गेलं तर हृदयाचा बाकी अवयवांशी संपर्क तुटत असणार. त्यामुळे मन थांबून माणूस मरतो.

**कृतवर्मा:** पण ठार मारलेल्या माणसाचं हृदय मी कापून काढून आतून पाहिलेलं आहे. त्यात मन मावलेलं मला कुठे दिसलं नाही.

**मयाहुर:** पण त्याने काही सिद्ध होत नाही. समजा एका दमलेल्या माणसाला आपण ठार मारला आणि त्याचे हातपाय चिरून पाहिले, तर त्याच्या स्नायूंतला थकवा डोळयांना दिसणार नाहीच. स्नायूंत थकवा असतो तसंच हृदयात मन असणार.

**कृतवर्मा:** मला अजून पटलेलं नाही. लढाई करतानाचा माझा एक अनुभव सांगतो. शत्रूने माझ्या हृदयावर बाण सोडला तर तो माझ्या हृदयाच्या रोखाने येतो आहे अशी जाणीव मला होते. पण माझ्या डोळयांवर सोडला तर तो माझ्या रोखाने येतो आहे अशी जाणीव होते. म्हणून मला वाटतं की मन हे दोन डोळयांच्या मधोमध डोक्यात असावं, हृदयात नाही.

**मयाहुर:** ह्या वाटण्यावर मी फार भिस्त ठेवणार नाही. का ते सांगतो. माणसाच्या पाच ज्ञानेंद्रियांपैकी चार, म्हणजे डोळे, नाक, कान आणि जीभ ही निव्वळ योगायोगाने डोक्यात आहेत. पाचवं अंगभर विखुरलेलं आहे. त्यामुळे डोकं फार महत्त्वाचं आहे असं आपल्याला विनाकारण वाटतं. बाण तुला डोळयांनीच दिसत असल्यामुळे डोळयांकडे येताना तो तुझ्याकडे येतो आहे असं वाटतं. पण तुझं मन कुठं आहे याच्याशी त्याचा संबंध नाही. तुझं मन तुझ्या अंडकोषात जरी असतं तरीसुद्धा डोळयांच्या रोखाने येणाऱ्या बाणाची तुला तितकीच भीती वाटली असती.

**सीनू:** पण मग मेंदूचा उपयोग काय? त्याचा हृदयाशी काही ना काही संबंध असणार. कारण डोक्याला

जोरात लागलं तरी माणूस मरतोच.

**मयाहुरः** मी यवनांच्या देशात असताना काय ऐकलं ते सांगतो. अशा गोष्टींवर ते सतत चर्चा करत असतात. त्यांचा तर्क असा आहे की संवेदना वाहून वाहून रक्त गरम होतं, आणि ते मेंदूत जाऊन थंड होऊन बाहेर येतं. मेंदूचा उपयोग हा आहे. पण जर मेंदू निकामी झाला तर खूपसं गरम रक्त हृदयात एकदम घुसून मनही निकामी होतं. म्हणून माणूस मरतो.

**संजयः** इथपर्यंत थोडंसं समजलं. पण मला वर मिळाल्यानंतर ह्यात काय फरक पडला असेल?

**मयाहुरः** ते मलाही नीट समजलेलं नाही. पण एक सर्वसाधारण तत्त्व म्हणून असं सांगता येईल की काही वस्तू इतर वस्तूंवर लांबवरून प्रभाव पाडू शकतात. चंद्राचा समुद्रावर प्रभाव पडून त्याला फुगवटा येतो, किंवा सूर्याचा गवतावर प्रभाव पडून ते वाळतं. व्यासाने जेव्हा तुला वर दिला तेव्हा तुझ्या कानांवर आणि डोळ्यांवर प्रभाव पाडून ते त्याने जास्त तिखट केले असावेत. म्हणूनच तुला लांबचं ऐकू येतं आणि लांबचं दिसतं. पण असा प्रभाव सगळ्याच वस्तूंचा सरसकट नसतो. सूर्याचा समुद्रावर प्रभाव पडत नाही, किंवा चंद्राला गवत वाळवता येत नाही. वर हा प्रकारही तसाच असावा. विशिष्ट माणसांना विशिष्ट कामीच तो देता येत असणार. कुणीही देऊन उपयोग नाही.

**संजयः** मला पुरतं कळलं असं वाटत नाही.

**मयाहुरः** हे पाहा, ह्या सगळ्याचा शक्य तितका सुसंगत अर्थ लावता यावा एवढाच माझा प्रयत्न आहे. तो लागला आहे असं मी म्हणत नाही. आपल्या हातात दुसरं काही आहे का?

**कृपाचार्यः** ठीक आहे, तूर्तास असं समजू की मयाहुर म्हणतो ते बरोबर आहे. पण मग दुसऱ्या माणसाच्या मनातलं संजयला कसं समजू शकेल? हा काही संजयच्या एका कुठल्या अवयवावर व्यासाने पाडलेला प्रभाव नव्हे. तर संजयचं हृदय आणि दुसऱ्या माणसाचं हृदय ह्यांच्यात संबंध जोडून आणायचा असा हा वेगळ्याच जातकुळीतला प्रश्न आहे. पण तसं कसं करणार?

**मयाहुरः** ढोबळपणे बोलायचं म्हणजे पिकलेला आंबा कैरीशेजारी ठेवला तर कैरी पिकते तशासारखं काहीतरी हे आहे. संजयचं मन ही कैरी आहे असं समजलं तर ह्या कैरीला असा वर दिलेला आहे की जवळ असलेल्या आंब्यांचं पिकलेपण तू वेगाने आत्मसात करू शकशील. आता ह्यापेक्षा जास्त चांगली उपमा मला

तरी सुचत नाही, कारण उपमेयातच गोंधळ आहे.

**संजय:** हा वर मिळाल्यापासून तो पडताळून पाहण्याचा मी थोडाफार प्रयत्न केला आहे. माझा निष्कर्ष सांगतो. पिकलेल्या आंब्याशेजारी कैरी ठेवली तर ती पिकते, आणि पिकलेल्या केळ्याशेजारी ठेवली तरीही पिकते. पण तुपाच्या हंड्यात बुचकळली तर पिकत नाही. कैरीच्या सालीत तुपाचा वास शिरून तिची चव फक्त किंचित बदलते. दुसऱ्याचं मन समजावून घेणं हा प्रकार मला काहीसा असाच वाटतो. कधीकधी ते जमतं, पुष्कळदा जमत नाही. जमायचं तर रसायन जुळलं पाहिजे.

**मयाहुर:** पण हे काही स्पष्टीकरण नव्हे. आपण नुसती उपमा पुढे रेटतो आहोत.

**संजय:** खरं आहे, पण मी तरी आणखी काय करू शकतो? मघाशीच घडलेला एक प्रसंग आहे, थोड्या विस्ताराने सांगतो.  कृतवर्मा आणि मी इथे येत असताना घोड्याला तहान लागल्यामुळे आम्ही थांबलो. आम्हाला पाणी देणारा सैनिक इरावानाच्या सैन्यातला, म्हणजे पांडवांकडून लढणारा होता. तो जातीने भिल्ल आहे आणि पोषाखही तसाच करतो. घोडा पाणी पीत असताना हा माणूस अदबीने माझ्यासमोर उभा होता. एक चाळा म्हणून त्याच्या मनातले विचार समजून घेण्याचा जेव्हा मी प्रयत्न केला तेव्हा माझ्या लक्षात आलं की तो असातसा नसून एक विशिष्ट भिल्ल आहे.

हे कळण्यासाठी तुम्हाला लाक्षागृहाची हकिकत सांगावी लागेल. खूप पूर्वीची म्हणजे पांडवांचं अजून लग्न व्हायचं होतं तेव्हाची गोष्ट. पांडव खूप बलाढ्य होऊ लागल्यामुळे धृतराष्ट्राला वाटू लागलं की त्यांचा काटा काढावा. वारणावतामध्ये त्याने एक लाखेचं घर बांधून घेतलं, आणि पांडवांना कुंतीसह तिथे राहायला पाठवलं.

**मयाहुर:** मला त्या घराबद्दल खूप कुतूहल होतं, म्हणून ते बांधणाऱ्याला मी शोधून काढून भेटलो. त्याचं नाव आता मी विसरलो, पण तो मूळचा चीनमधला. लाखेला मजबुती आणता यावी याकरिता चतुराई वापरून त्याने वेगवेगळे प्रयोग करून पाहिले होते. त्याच्याशी बोलून मला खूप शिकायला मिळालं. मी हे घर कधी पाहिलं नसल्यामुळे माझी कल्पना होती की ते नुसतं लालेलाल असेल. पण तसं नव्हतं. तो मला म्हणाला की लाखेत कितीतरी रंग आणता येतात. त्या घराच्या दिवाणखान्यात त्याने रेशीमरस्त्यावरच्या वेगवेगळ्या देखाव्यांची भित्तिचित्रं काढली होती. पण नंतर ते सगळं जळाल्याचं ऐकून त्याला फार वाईट वाटलं.

**संजय:** ते जळण्यासाठीच बांधलेलं होतं. पांडव त्यात राहायला गेल्यानंतर एके रात्री ते पेटवून द्यावं असा दुर्योधनाचा कट होता. पण युधिष्ठिराला हे आधीपासून ठाऊक होतं. त्याने त्या रात्री एक भिल्लीण आणि तिचे पाच मुलगे ह्यांना एकत्र जेवायला बोलावलं आणि सरसकट सगळ्यांना खूप दारू पाजून झोपवलं. रातोरात पांडव कुंतीसह पळून गेले. घर एकदाचं जळाल्यानंतर दुसऱ्या दिवशी सकाळी जी प्रेतं सापडली ती काही ओळखता येण्यासारख्या परिस्थितीत नव्हती. एक बाई आणि पाच पुरुष आहेत इतकंच दिसलं, तेव्हा दुर्योधन खूष झाला. पांडव जिवंत आहेत हे त्यानंतर कित्येक दिवस त्याच्या लक्षात आलं नाही.

**कृतवर्मा:** त्यावेळी पांडवांना खूप यातायात झाली म्हणतात. हवी तशी बाई मिळायला फार शोधावं लागलं. एका बाईला पाच मुलगे होते पण ती दारू पिणाऱ्यातली नव्हती. दुसरी एक दारू पिणारी मिळाली पण तिला तीनच मुलगे होते. तिसरी एक दारूबाज होती आणि तिला पाच मुलगेही होते पण त्यांतला एक थोटा निघाला. जळाल्यानंतर एका प्रेताचा हात संशयास्पद दिसला असता, आणि पांडवांना तो धोका पत्करायचा नव्हता. एक ना दोन. पण शेवटी जमलं.

**संजय:** तर मला भेटलेला सैनिक म्हणजे त्या दिवशी जळून मेलेल्या भिल्लिणीचा नवरा. त्या रात्री तो शिकारीला गेलेला होता आणि मचाणावरच झोपला होता. आल्यानंतर त्याला सगळी हकिकत कळली. त्याच्या मनात मला दिसलं ते असं की शेजारच्या गावात त्याने दुसरी एक भिल्लीण ठेवलेली होती. जुनी बायको दारू पिऊन कजागपणा करत असे आणि पोरंही त्याच नादाला लागलेली होती. त्यांना पैसा पुरवून पुरवून बापाच्या कमरेचा काटा ढिला झालेला होता. हे लोढणं रातोरात आपसूक गळ्यातून उतरल्यामुळे तो भलताच खूष झाला, आणि आठवडाभरातच राजरोस दुसरीबरोबर राहायला गेला. पांडवांचे उपकार मानून तो आता त्यांच्या बाजूने लढतो आहे.

ह्या भिल्लाच्या जागी मी असतो तर बायकामुलं मेल्याचं मला प्रचंड दु:ख झालं असतं. त्याला ते थोडंसुद्धा झालेलं नाही. माझ्या मनात पांडवांविरुद्ध प्रचंड सूडाची भावना असती. ती त्याच्यात थोडीसुद्धा नाही. ह्या भिल्लाचं मन मला अगम्य वाटलं. मी कैरी असेन तर तो तुपाचा हंडा आहे. वरून वास लागेल पण आतल्या गराचं तूप होणार नाही. माझ्या आजूबाजूला असे तुपाचे हंडे खूप आहेत आणि पिकलेले आंबे थोडेच आहेत. व्यासाला हे आधी कळायला हवं होतं, पण अघळपघळ वर देऊन तो मोकळा झाला आहे.

**कृतवर्मा:** मी तर म्हणतो की व्यासाला काय अभिप्रेत होतं हे तुला समजलेलं नाही याचाच अर्थ वर फसला आहे. कारण नाहीतर त्याचं मन तुला समजायला हवं होतं. तो स्वत: तुपाचा हंडा नव्हे तर कुजलेल्या मासळीची टोपली आहे. त्याचा वाससुद्धा न लागलेला बरा.

**मयाहुर:** हे पाहा, व्यासावर तरी आपण कशाला इतकी धार धरायची? माणूस हुशार आहे म्हणतात, पण ह्या प्रांतात तोही चाचपडत असणार. तुम्हाला मी मघाशी म्हणालोच: यवनांना ह्या विषयाचा कधी कंटाळा येत नाही. मन कशाचं बनलेलं असतं, त्यात विचार कसे येतात, मनाला गोष्टी लक्षात कशा राहतात आणि विसरतात कशा, बायकांचं मन वेगळं असतं का, अशा मुद्द्यांवरून त्यांच्याकडे खूप धुमश्चक्री चालते. कुणाच्या मतात कुठे भेग आहे ह्याची डोळ्यात तेल घालून छाननी होते. पण इतकं करूनही त्यांना स्वच्छ उलगडा कशाचाच झालेला नाही.

माझा एक अनुभव सांगतो. तिथले लोक 'सुराशार समुद्र' असं खूपदा म्हणतात. हा शब्दप्रयोग त्यांच्या नाटकांत येतो, कवितांत येतो. मला चमत्कारिक वाटला. समुद्र निळाशार असेल, काळाशार असेल, पण सुराशार कसा असेल? एकतर त्यांची सुरा जगावेगळी नसते. वेगवेगळ्या द्राक्षांपासून बनवलेली सुरा इथे जशी वेगवेगळ्या प्रकाशांत वेगवेगळी दिसते तशीच त्यांच्याहीकडे दिसते. त्यांचा समुद्र दिसायला जगावेगळा नसतो. वेगवेगळ्या प्रकाशांत जसा भारतातला समुद्र वेगवेगळा दिसतो तसाच त्यांच्याहीकडे दिसतो. म्हणून माझ्या ओळखीतल्या कितीतरी यवनांना मी खोदून खोदून विचारलं की 'सुराशार समुद्र' म्हणजे काय? पण सगळ्यांना मान्य होईल असं एकच एक उत्तर मला काही मिळालं नाही. काहीजण म्हणाले की मावळतीच्या समुद्राचा रंग सुरेसारखा दिसतो. काहीजण म्हणाले की समुद्राकडे पाहिल्यावर जो एक गहिरा खिन्न भाव मनात येतो तो सुरा प्यायल्यावरही येतो. रंगाशी त्याचा संबंध नाही. काहीजण म्हणाले की हा शब्दप्रयोग कवितेत ऐकायला छान वाटतो आणि वृत्तात घट्ट बसतो म्हणून आम्हाला तो आवडतो, पण त्याला नक्की असा अर्थ नाही. म्हणजे 'सुराशार समुद्र' असं जेव्हा दोन यवन एकमेकांसमोर म्हणतात तेव्हा त्यांना बहुतेक वेळा परस्परांचं मन समजलेलं नसतं. पण हे ठाऊक असूनही ते म्हणतातच याचा अर्थ त्यांना त्याची विशेष पर्वाही नसते. तसंच दामटून नेतात पण बिघडत काही नाही.

**कृपाचार्य:** एखादा यवन पकडून इथेच आणला पाहिजे. संजयचं हे मनसामुद्रिक त्याच्यावर कितपत चालेल ते बघायची मला फार उत्सुकता आहे.

**संजय:** मला तर काहीच समजणार नाही, कारण मी कधी समुद्र पाहिलेला नाही. इंद्रप्रस्थ आणि हस्तिनापुराच्या पंचक्रोशीबाहेर मी अजून पडलेलो नाही.

**सीनू:** म्हणतोस काय?! संजया, तुझं आयुष्य नुस्तं वाया चाललं आहे! समुद्र बघितल्याखेरीज माणसाचं खरं नाही. मघाशी मी म्हणाले ते धंद्यातल्या भागीदारीचं वगैरे राहू दे. हे सगळं संपलं की तू माझ्याबरोबर

समुद्र पाहायला चल. एकदा बघितलास की विसरणार नाहीस.

**कृतवर्मा:** सीनू, 'सगळं संपलं' हा शब्दप्रयोग करून माझा अंत पाहू नकोस. हा पटांगणातला प्रकार कुठवर आला आहे? आधी तो संपल्याखेरीज सगळं कसं संपेल?

**कृपाचार्य:** माझ्याही मनात तोच प्रश्न होता. कितवा अध्याय सुरू आहे?

**संजय:** नववा आत्ताच सुरू झाला आहे.

**सीनू:** नऊ दुणे अठरा. हात्तिच्या! म्हणजे निम्मासुद्धा काथ्या अजून कुटून झालेला नाही. अजून खूप वेळ जायचा आहे!

**कृतवर्मा** (भुवया आक्रसत): हो. जायचा आहे खरा. पण तो जाणार कसा?

**सीनू:** तर माझा प्रस्ताव ऐका. आत्ताच्या आपल्या चर्चेचं सार काय होतं? हेच की माणसांना एकमेकांचं मन समजणं अवघड जातं. याहीपुढे जाऊन मी म्हणते की दुसऱ्याचंच काय तर स्वत:चंही मन स्वत:साठी अंधाऱ्या फडताळासारखं असतं. तिथे शोधल्यावर काय सापडेल ह्याचा आधी अंदाज नसतो आणि जे सापडतं ते नकोसं वाटतं. अर्जुनाचं तुम्ही बघताच आहात. तर ह्या विषयावरची एक छोटेखानी गोष्ट माझ्याकडे आहे. बाबीलमध्ये ती मी ऐकली आणि लगोलग लिहून घेतली. तुम्हाला ऐकायची असेल तर वाचून दाखवते. वेळ छान जाईल.

**कृपाचार्य:** मी तयार आहे.

**कृतवर्मा:** मीही तयार आहे.

**सीनू:** मग थांबा, मी आलेच. (उठून गाड्याकडे जाते आणि एक चोपडी घेऊन येते.) तर ऐका! गोष्टीचं नाव आहे 'समद्विभुजा.'

**कृतवर्मा:** समद्विभुजा?

**सीनू:** समद्विभुजा.

(गोष्ट वाचली जात असताना आपलं लक्ष नाहीसं दाखवत मयाहुर शून्यात नजर लावून बसला आहे.)

## समद्विभुजा

दमास्कस शहरामध्ये सायरस आणि घनीम हे दोघे तरुण मित्र राहत होते. एकमेकांना वरचेवर भेटल्याखेरीज त्यांना चैन पडत नसे, आणि गप्पा मारण्यात त्यांचे तासनतास खर्च होत असत.

एके दिवशी अथीना नावाच्या एका देखण्या मुलीशी सायरसची ओळख झाली. दोघे पटकन प्रेमात पडले, आणि ह्यानंतर लवकरच त्यांनी लग्न करून एक टुमदार घर घेतलं. सुरवातीच्या काही दिवसांत घनीम दोघांना भेटून जात असे, पण हळूहळू तो येईनासा झाला. सायरस म्हणाला, “बाबारे, आपली दोघांची इतक्या वर्षांची मैत्री आहे. ती इतक्या सहजासहजी अडगळीत टाकणं तुला कसं जमतं?” यावर घनीम म्हणाला की मला मैत्री नको आहे असं नाही, पण लग्नानंतर तरुण जोडप्याला आपल्यात तिसरं कुणी नसावंसं वाटतं. म्हणून मी चार हात लांब राहतो आहे. आणि त्याखेरीज अथीना चारचौघांत उठून दिसण्यासारखी असल्यामुळे तिऱ्हाइताने तुमच्या घरी वारंवार येणं प्रशस्त नव्हे. ह्यावर सायरस म्हणाला की तू असा ग्रह करून घेऊ नकोस. तू आपला येत जा. तुझ्याशी बोलल्याखेरीज मला बरं वाटत नाही.

एके दिवशी ठरवून सायरस घनीमला घराबाहेर भेटला. तो म्हणाला, “मी तुला इथे बोलावलं ह्यामागे तसंच कारण आहे. अथीना माझ्यावर प्रेम करते आणि ती माझ्याशी एकनिष्ठ आहे याबद्दल माझी पक्की खात्री आहे. परंतु तिच्या निष्ठेची पुरेशी कसोटी लागली आहे असं मला वाटत नाही. कदाचित फारसे पुरुष तिने जवळून पाहिलेले नसल्यामुळे तिला मी आवडलो आणि तिने माझ्यापलीकडे विचार केला नाही असं शक्य आहे. एखाद्या गबाळ्या माणसावर ती लट्टू होणार नाही हे मान्य. पण सरासरीच्या खूपच वरचा असा कुणी तरुण जर तिच्याकडे लक्ष पुरवू लागला तर तिच्या मनात चलबिचल होणार नाही याचा काय भरवसा आहे? तेव्हा माझी इच्छा अशी आहे की तू तिच्याकडे प्रेमयाचना करून पाहावीस.” हे ऐकून घनीम अवाक झाला. तो म्हणाला, “अशी विषाची परीक्षा बघणं हा शुद्ध वेडेपणा आहे. आणि मी असं करणं हा अथीनाचा अपमान नाही का होणार?” ह्यावर सायरस म्हणाला की काही बायकांना गरोदर असताना लाकूड, चिखल, खडू असल्या विचित्र गोष्टींची खावखाव सुटते. त्यावर काही इलाज नसतो. माझी तशीच अवस्था आहे असं समज. ही चाचणी मला घेऊन बघायचीच आहे, तेव्हा माझी तेवढी एक हौस तू पुरी कर. पण घनीम ह्याला तयार होईना. तेव्हा सायरस खिशात हात घालून म्हणाला की आपण

नाण्याचा कौल घेऊन बघू. जर एनकिडू आला तर तू माझ्या मनासारखं कर, आणि सिंह आला तर मी माझा हट्ट सोडून देईन. ह्यामागचा सांकेतिक अर्थ स्पष्ट आहे. एनकिडू आणि गिलगामेश यांची मैत्री प्रसिद्ध आहे, तेव्हा एनकिडू आला तर तू तुझ्या मित्राचं म्हणजेच माझं ऐकायला हवंस. ह्याउलट सिंह हा निष्क्रिय प्राणी असल्यामुळे तो आला तर आपण सध्याची  परिस्थिती बदलू नये असा त्याचा अर्थ होईल. घनीम याला कसाबसा तयार झाला. सायरसने नाणं वर उडवलं, ते खाली पडताच एनकिडू दिसला. सायरस घनीमला म्हणाला की उद्याच तू चाचणीला सुरुवात कर.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी जेव्हा घनीम ह्या जोडप्याला भेटायला आला तेव्हा सायरस त्यांना म्हणाला की काही तातडीच्या कामासाठी मला बाहेर जाऊन यावं लागेल, तोपर्यंत तुम्ही बोलत बसा. कुणाला काही प्रत्युत्तर करण्याची सवड न देताच तो तडकाफडकी निघून गेला. प्रत्यक्षात तो घराला एक वळसा घालून किल्लीच्या भोकातून बघत बसला होता. यानंतरच्या दिवशी जेव्हा घनीम आणि सायरस भेटले तेव्हा घनीम म्हणाला की मी तुझ्या म्हणण्याप्रमाणे अथीनाकडे प्रेमयाचना करून पाहिली पण तिने मला मुळीच दाद दिली नाही. यावर सायरस म्हणाला की तू खोटं बोलू नकोस. माझ्यावरच्या प्रेमापोटीच तू खोटं बोलतो आहेस हे मला ठाऊक असलं तरीसुद्धा बोलू नकोस. मी घर सोडताक्षणीच तू आरामखुर्चीत झोपून गेलास आणि माझी चाहूल लागताच खडबडून उठलास हे मला चांगलं ठाऊक आहे. तू मला शब्द दिलेला आहेस, तेव्हा पुन्हा रीतसर आणि निकराचा प्रयत्न करून बघ. या फंदात कुठून पडलो असं घनीमला वाटत राहिलं, पण आता वेळ निघून गेलेली होती. पण त्याने विचार असा केला की हे सगळं संपल्यानंतर मी अथीनासमोर सफाई देऊन तिची सपशेल माफी मागेन. त्यामुळे ह्या प्रकरणावर पडदा पडेल आणि सारं काही पूर्वीसारखं होईल.

त्या दिवसानंतर ही ना ती सबब सांगून सायरस सतत प्रवासावर जाऊ लागला, जेणेकरून घनीमला पुरेसा वेळ मिळावा आणि हा प्रयोग नीट राबवता यावा. त्याच्या ह्या वागणुकीमुळे अथीना बुचकळ्यात पडली. घनीम तिला भेटत राहिला, आणि आपल्या नवऱ्याचा मित्र म्हणून ती त्याचं आदरातिथ्य करत राहिली. घनीमने असं ठरवलं की प्रेमयाचनाच जर करायची तर ती कशीबशी उरकून घेण्यापेक्षा नीट करावी. ह्या त्याच्या बेतानुसार तो अथीनाकडे भरभरून लक्ष देऊ लागला. अथीनाने आपल्या नवऱ्याला एकदा हे बोलून दाखवलं की घनीम माझ्याशी फार संशयास्पद वागतो आहे, आणि मला काही हे आवडत नाही. सायरसला कळून चुकलं की घनीमने चाचणी मनावर घेतलेली आहे. तो अथीनाला म्हणाला की मला कामासाठी बाहेरगावी जावं लागत असल्यामुळे घनीमला एकटं वाटत असेल, म्हणून तो आपल्या घरी येतो. त्याला तू दूर लोटू नकोस. स्वत:च्या वागण्यात सायरसने तसूभरही फरक केला नाही, आणि पूर्वीसारखाच तो वारंवार शहर सोडून जात राहिला.

घनीम येतच राहिला. तो दिसायला उमदा असल्यामुळे आणि बोलण्यात चतुर व कोटिबाज असल्यामुळे हळूहळू अथीनाच्या मनाचा कल त्याच्या दिशेने होऊ लागला. ती स्वत:शी असं म्हणाली की माझ्या नवऱ्याचं बहुतेक काहीतरी प्रकरण आहे आणि म्हणूनच तो नेहमी बाहेर असतो. त्याला जर माझ्याबद्दल काही वाटत नसेल आणि हा इतका छान माणूस जर माझ्या प्रेमात असेल तर मी नाही का म्हणावं? आणि अशा रीतीने अथीना घनीमला वश झाली. घनीमला हे पूर्णपणे अनपेक्षित होतं, पण सायरसला ते सांगितल्यामुळे त्याला दु:खच होईल अशा विचाराने तो काही बोलला नाही. सायरसला तो म्हणाला की तुझी बायको तुझ्याशीच एकनिष्ठ आहे, आणि माझ्या प्रियाराधनामुळे संतापून जाऊन तिने मला तुझ्या घरी यायची बंदी केलेली आहे.

एके दिवशी सायरस शहर सोडून गेलेला असताना घनीम अथीनाच्या घरी आला. पण सायरस प्रत्यक्षात गेलेलाच नव्हता तर आपल्याच घराच्या दिवाणखान्यावर बाहेरून पाळत ठेवून होता. अथीना घनीमचं चुंबन घेताना त्याला नेमकी दिसली. ह्या वेळी घनीम पाठमोरा असल्यामुळे सायरस तिथे असल्याचं त्याला कळलं नाही, पण अथीनाला मात्र सायरस तिच्याकडे पाहताना ओझरता दिसला. तिने आपल्याला पाहिलं आहे हे सायरसच्या लक्षात आलं नाही. सायरस जेव्हा परत आला (अर्थात तो खरा गेलेला नव्हताच) तेव्हा पोटात बाकबूक होते आहे अशा अवस्थेत अथीनाने त्याचं स्वागत केलं. आता कोणत्याही क्षणी तो आपल्याला जाब विचारणार ह्या भीतीमुळे अथीनाचं मन तिला खाऊ लागलं. पण प्रत्यक्षात जेव्हा तसं काहीच झालं नाही, तेव्हा आता कसं वागावं हे अथीनाला समजेना. तिने तर्क असा केला की सायरस स्वत: बाहेरख्याली असावा आणि या गोष्टीची शरम वाटत असल्यामुळे बायकोला जाब विचारण्याची त्याची हिंमत होत नसावी. आपली प्रतारणा सायरसला ठाऊक असल्याचं तिने घनीमला सांगितलं नाही. ती सायरसला म्हणाली की घनीम माझ्याशी संशयास्पद वागतो आहे असं जे मी पूर्वी बोलले होते तो माझाच गैरसमज होता, प्रत्यक्षात तसं काही नाही.

एक व्यक्ती म्हणून घनीमला अथीना आवडत असली तरीदेखील तिच्यावर त्याचं प्रेम नव्हतं. पण सायरसच्या वागण्यामुळे ती अधिकाधिक दु:खी झालेली पाहून तिला सोडून देणं त्याला आता शक्य राहिलेलं नव्हतं. खोटं भांडण काढून आपण अथीनाला तोडून टाकण्याचा प्रयत्न केला तर तिला आणखी वाईट वाटेल ह्या कल्पनेने तो हतबल झाला. आपण पुरते फसलो ही भावना त्याच्या मनात बळावत चालली.

एके दिवशी संध्याकाळी सायरसने घनीमला निरोप पाठवला की अथीना बाजारहाट करायला गेलेली आहे,

तेव्हा तू घरी यायला हरकत नाही. घनीम आला. तो सायरसला म्हणाला की मला थोडाच वेळ थांबता येईल, कारण अथीनाने मला इथे बघितलं तर डोक्यात राख घालून ती मला हाकलून देईल. एक बाब तुला आवर्जून सांगायची आहे ती अशी की ही सत्वपरीक्षा आता आपण दोघांनी निष्कारण ताणू नये. तुझ्या बायकोची तुझ्यावरची निष्ठा अढळ आहे याबद्दल मला खात्री कधीचीच होती, पण तुझ्याही मनातला किंतू आता तू कायमचा सोडून द्यायला हवास. तिला तू सगळा बनाव सांग, त्यानंतर आपण दोघेही तिची क्षमा मागू आणि पूर्वीसारखे राहायला लागू. ह्यावर सायरसने खिशातून सुरा बाहेर काढला आणि चवताळून तो घनीमच्या अंगावर धावून गेला. घनीम जास्त चपळ असल्यामुळे त्याने सायरसकडून सुरा हिसकावून घेतला, पण हातापायीमध्ये सायरसला वर्मी जखम झाली. घनीम घाबरून गेला, आणि पळ काढण्याच्या बेतातच होता तेवढ्यात अथीना हजर झाली. ती घनीमला म्हणाली की इथे थांबलास तर तुला शिपाई धरून नेतील. आणि मलाही आता ह्या घरात राहणं जिवावर आलेलं आहे. तेव्हा तू मला घेऊनच चल. नाही म्हणणं घनीमला शक्य नव्हतं. खर्चाला पैसे असावेत म्हणून त्याने बेशुद्ध पडलेल्या सायरसच्या खिशातलं एकुलतं एक नाणं हस्तगत केलं. जीव मुठीत धरून दोघेही रातोरात शहराबाहेर पळाले.

दुसऱ्या दिवशी रस्त्यालगतच्या एका भटाऱ्याकडून घनीमने पाव विकत घेतला. खिशात घातलेला हात बाहेर काढताच त्याच्या लक्षात आलं की नाण्याच्या दोन्ही बाजूंना एनकिडू आहे. परंतु नाण्यात चांदी असल्यामुळे भटाऱ्याने ते किंमत पाडून का होईना पण घेतलं.

अथीना आणि घनीम ह्यांना घर करावं लागलं. सायरसने त्या दोघांना चोरून बघितल्याचा प्रसंग अथीनाने जेव्हा घनीमला सांगितला, तेव्हा सायरस का संतापला हे त्याला कळून चुकलं. मात्र ह्या संपूर्ण प्रकरणाची सुरुवात कशी झाली ह्याबद्दल तो अथीनाकडे अवाक्षरही बोलला नाही. तिला आनंदात ठेवण्याचा तो यथाशक्ति प्रयत्न करू लागला, आणि आपल्या चतुर बोलण्याचं प्रमाण त्याने वाजवीपेक्षा जास्तच वाढवलं. पण दिवसांगणिक घनीमचा उमदेपणा कमी झाला होता, आणि जो कोटिक्रम अथीनाला आधी आवडत असे तो सतत ऐकावा लागल्यामुळे कंटाळा येत चालला होता. घनीमचं आपल्यावर प्रेम नाही हे अथीनाला लवकरच कळून चुकलं, पण त्याने तशी बतावणी का करावी हे मात्र तिला कधी कळलं नाही. इतक्या चांगल्या माणसाला सापळ्यात अडकल्यासारखं वाटावं ह्याला आपण काही अंशी कारणीभूत झालो ह्या भावनेने ती कायमची दु:खी झाली. आपली जी मैत्रिण होती ती प्रेयसी असल्याचं ढोंग करून तिला आपण फसवलं आणि स्वत:देखील फसलो ह्या भावनेने घनीमही कायमचा दु:खी झाला. ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम नाही तिच्याबरोबर आयुष्य काढण्याचा प्रसंग अशा प्रकारे दोघांवर येऊन ठेपला. परंतु संसार तसाच पुढे ढकलत राहण्याव्यतिरिक्त त्यांच्यासमोर पर्याय उरलेला नव्हता.

सायरसची जखम हळूहळू बरी झाली. पण त्याला दारूची सवय लागली आणि लवकरच तो कफल्लक झाला. चिडचिडेपणा हा त्याचा स्थायीभाव बनला, आणि स्त्रीजातीविषयीचं त्याचं मत कायमचं बिघडून गेलं.



**कृपाचार्य:** गोष्ट आवडली. 'तिघेही सुखी होते' पासून 'तिघेही दुःखी झाले' पर्यंतचा प्रवास गंमतीचा आहे. अर्थात गोष्ट ऐकणाऱ्यासाठी गंमतीचा आहे, त्यातल्या पात्रांसाठी गंमतीचा नाही.

**कृतवर्मा:** गोष्टीमागची कल्पना मला अशी दिसते की पांढऱ्या रंगाचा एक समद्विभुज त्रिकोण होता, आणि तो मधोमध उंचीवर पलटवताच त्याचा काळा त्रिकोण झाला. अथीना हा त्रिकोणाचा शिरोबिंदू आहे आणि दोघे पुरुष हे तिच्यापासून समान अंतरावर असलेले पायाचे दोन बिंदू आहेत. आधी तिची एका बिंदूशी जोडी होती, ती तुटून दुसऱ्या बिंदूशी झाली. हा संकेत गोष्टीतच आहे, कारण नाणं पलटवलं तरी एनकिडूचा एनकिडूच राहतो. काटेकोर विचार करणाऱ्या कुणीतरी ही गोष्ट रचलेली आहे.

**कृपाचार्य:** मयाहुरा, तू काहीच कसा बोलत नाहीस? गोष्ट तू पूर्वी वाचली होतीस की काय?

**सीनू:** तो लाजतो आहे. गोष्ट त्यानेच लिहिलेली आहे. बाबील वगैरे ती माझी थाप होती.

**संजय:** हे मला आधीच ठाऊक होतं, पण म्हटलं आपण कशाला बोला?

**सीनू:** अरे हो! तुला समोरच्याचं मन वाचता येतं नाही का? मी विसरलेच होते. पण ह्याचा अर्थ तुला गोष्टीत काय होणार हे आधी कळलं असेल.

**संजय:** नाही. माणसांच्या मनातलं ओळखताना जिथे पुरेवाट होते, तिथे गोष्टीतल्या माणसांच्या मनातलं ओळखणं शक्य नाही. मी गोष्टीच्या आत असतो तर वेगळं होतं. मग अथीनाला आधीच सगळं सांगून सावध केलं असतं.



('अरे, तिकडे बघा!', 'कुठे?', 'तिथे समोर बघा!', 'दिसतंय का?', 'काय झालं?', 'काही कळत नाहीय' असे आवाज अचानक चोहोबाजूंनी येऊ लागतात. सीनू उठून मागे पळत जाते. अनेक सैनिक तिच्या गाड्यावर चढून एकटक दूरवर पाहताहेत. इतर काही सैनिक त्यांच्या खांद्यावर चढले आहेत.)

**सीनू:** अरे, आधी खाली उतरा बघू! माझा गाडा मोडाल तुम्ही. (सैनिक दाद देत नाहीत.) अरे, उतरा म्हणते ना! माझा धंदा बंद पडला तर अफूच काय फुटाणेदेखील मिळायचे नाहीत.

(हे ऐकून सैनिक नाईलाजाने खाली उतरू लागतात.)

**कृतवर्मा:** काय झालं?

**एक सैनिक:** अर्जुन उताणा पडून एकटक सूर्याकडे बघतो आहे. त्याला उर्ध्व लागला आहे. मोठे गोपाळ ओणवे होऊन उजव्या हाताचा तळवा त्याच्या डोळ्यांसमोरून फिरवताहेत.

**कृपाचार्य:** हा पुन्हा ढेपाळलेला दिसतोय! आता मात्र युद्ध होत नाही एवढं नक्की आहे. कुणीतरी त्याला बाजूला घेऊन जा म्हणावं, आणि आम्हाला रीतसर मोकळं करा. आम्ही आपापल्या घरी जाऊ.

**संजय:** मी बघतो काय चाललंय ते. (भुवया कुस्करत मन एकाग्र करतो.) काहीतरी विचित्रपणा चालू आहे. मलाही नीट समजत नाहीय.

(सीनू गाड्याकडे जाऊन पाहणी करते आहे.)

**सीनू:** मेल्यांनी गाड्याचं चाक पार जमिनीत रुतवलं. आता हे काढणार कसं? (सैनिकांना) काय रे ए शिंदळीच्यांनो, मी तुमच्यासाठी इतकं ओझं वाहते त्याचे असे पांग फेडता का?

(सैनिक ओशाळे होऊन चाक बाहेर काढायचा प्रयत्न करतात, पण त्यांना फारसं यश येत नाही.)

**एक सैनिक:** जमीन ओलसर आहे. जितकं ओढावं तितकं चाक आतच चाललं आहे.

**सीनू:** माझ्यावरचा शाप भोवला ग!

**कृतवर्मा:** तुला कोण शाप देईल बाई? इतके लोक तुझ्यावर प्रेम करतात.

**सीनू:** मला भूमातेचा शाप आहे हो!

**कृपाचार्य:** भूमाताने तुला का म्हणून शाप द्यावा?

**सीनू:** खूप वर्षांपूर्वी रेशीमरस्त्यावर घडलेली गोष्ट आहे. मी गाडा ओढत चालले होते. रस्त्याच्या कडेला एक म्हातारा रडताना दिसला. जवळ जाऊन बघितलं तर तो झिंगलेला होता. मला म्हणाला की सोमरसाचा एक बुधला मी सकाळी विकत घेतला होता. अर्धा लगेच प्यायलो आणि अर्धा रात्रीसाठी ठेवला होता. पण चालताना अडखळलो आणि सगळा सांडून गेला. नवा घ्यायला माझ्याकडे पैसे नाहीत. मी त्याला म्हणाले की रडू नकोस. जिथे सांडला होता तिथली माती मी गोळा केली, हंडाभर पाण्यात घातली आणि एका तलम रेशमी शेल्यातून ते मिश्रण गाळून घेतलं. माती शेल्यात राहिली आणि सोमरस पाण्याबरोबर खाली आला. चव गेलेली होती पण म्हाताऱ्याला काही फरक पडत नव्हता. मला दुवा देऊन तो निघून गेला. पण भूमातेच्या वाट्याचा सोमरस मी चोरून घेतला म्हणून मला शाप लागला. तिनेच माझं चाक गिळलं आहे.

(सैनिक निकराचा प्रयत्न करताहेत. 'अश्वत्थाम्याला बोलवा. त्याला नक्की जमेल. अश्वत्थाम्याला बोलवा' असा ओरडा होतो. सीनूने गाड्यातलं एक मडकं बाहेर आणलं आहे. ती धुळीत गुडघे टेकून बसते आणि क्षमायाचना पुटपुटत मडकं हळूहळू जमिनीवर रिकामं करते.)

**सीनू:** माते, क्षमा कर! तू आधार दिला नाहीस तर माझा गाडा चालायचा नाही. तू बाई आहेस, मी बाई आहे. मला मदत कर.

**मयाहुर** (अर्धवट स्वगत आणि अर्धवट इतरांना उद्देशून): युधिष्ठिराचा रथ जमिनीपासून दोन बोटं वर हवेत चालतो. असं का असावं ह्याची वेगवेगळी स्पष्टीकरणं मी ऐकली आहेत. काहीजण म्हणतात की तो पुण्यवान असल्यामुळे त्याला मिळालेलं हे बक्षीस आहे. काहीजण म्हणतात की आपण जगापासून अलिप्त आहोत असं दाखवण्याचा त्याचा हा मार्ग आहे. सीनूला पुण्यवान कुणी म्हणणार नाही आणि जगाला इतकी लिप्त असलेली बाई दुसरी मिळणार नाही. पण अशी सोय करून घ्यायची गरज तिलाच जास्त आहे, कारण मग चिखल असला किंवा जमीन भुसभुशीत असली तरी तिचा गाडा रुतणार नाही. ह्या

युद्धातून एकदाचा बाहेर पडलो की तसं काही करता येतं का ह्यावर मी विचार करणार आहे.

('अश्वत्थामा येतो आहे, वाट द्या!' असा ओरडा होतो. 'आला, आला' असे आवाज येतात, आणि मग 'बाजूला व्हा. जागा करा. आस्ते! शाबास' असे आनंदोद्गार ऐकू येतात. स्वत:ची प्रचंड ताकद लावून अश्वत्थामा चाक बाहेर काढतो, आणि काही अंतर गाडा ओढत नेऊन एका कातळावर अलगद ठेवून देतो. सीनूचे डोळे पाण्याने भरले आहेत.)

**सीनू** (अश्वत्थाम्याला): अरे, वा! वा! माझं खूप मोठं काम केलंस तू!

**अश्वत्थामा:** मला सवय आहे. इथे येण्यापूर्वी हे माझ्यासाठी नेहमीचं होतं.

**सीनू:** बस. विश्रांती घे. (अश्वत्थामा खाली बसतो. सारेजण त्याच्याकडे टक लावून पाहताहेत.)

**कृपाचार्य:** कपाळावरची जखम बरी आहे का आता?

**अश्वत्थामा:** बरी आहे. पण अधूनमधून दुखते.

**सीनू:** पाणसापाच्या रक्तात शतावरीचा मध घालून केलेली एक दवा माझ्याकडे आहे. थोडीथोडी लावत राहिलास तर नक्की गुण येईल.

**अश्वत्थामा:** नको. इतकी जुनी जखम जायची नाही. मी आहे तोपर्यंत ती आहे.



## अंक दुसरा

(कुरुक्षेत्राच्या धुळीमध्ये, गेल्या अंकातले संवाद जिथे झाले त्याच्याच जवळपास, अंदाजे वीस हात व्यासाचं एक गोलाकार रिंगण आखण्यात आलेलं आहे. दाटीवाटी करून उभ्या असलेल्या सैनिकांनी त्याचा परीघ वेढलेला दिसतो. रिंगणाच्या मधोमध अश्वत्थामा एकटा बसला आहे, आणि आजूबाजूला कोणीसुद्धा नसून आपलेच आपण विचारात गढलो आहोत असा अभिनय करतो आहे.

कृपाचार्याने डोळ्यांवर काळ्या रंगाच्या रेशमी रुमालाची पट्टी बांधली आहे. रिंगणात शिरून तो अश्वत्थाम्याच्या पाठीवर चढतो आणि त्याचा कान कुरवाळतो.)

**कृपाचार्य:** हत्ती सुपासारखा असतो.

(सैनिक खिदळतात. कृपाचार्य खाली उतरतो आणि रिंगणाच्या कडेला येऊन स्तब्ध उभा राहतो. संजयने डोळ्यांवर पांढऱ्या रंगाच्या रेशमी रुमालाची पट्टी बांधली आहे. रिंगणात शिरून तो अश्वत्थाम्याचा पाय चाचपडतो.)

**संजय:** हत्ती तुळईसारखा असतो.

(सैनिक खिदळतात. संजय बाजूला होऊन कृपाचार्याच्या डावीकडे स्तब्ध उभा राहतो. मयाहुराने डोळ्यांवर तांबड्या रंगाच्या रेशमी रुमालाची पट्टी बांधली आहे. रिंगणाच्या मध्यभागी जाऊन तो अश्वत्थाम्याच्या ढुंगणावर हाताने थापटतो.)

**मयाहुर:** हत्ती दगडासारखा असतो.

(सैनिक खिंकाळतात. मयाहुर बाजूला होऊन संजयच्या डावीकडे स्तब्ध उभा राहतो. सीनूने डोळ्यांवर हिरव्या रंगाच्या रेशमी रुमालाची पट्टी बांधली आहे. रिंगणाच्या मध्यभागी जाऊन ती अश्वत्थाम्याची शेपटी ओढते.

**सीनू:** हत्ती सापासारखा असतो.

(सैनिक खिदळतात. सीनू बाजूला होऊन मयाहुराच्या डावीकडे स्तब्ध उभी राहते. कृतवर्म्याने डोळ्यांवर पिवळ्या रंगाच्या रेशमी रुमालाची पट्टी बांधली आहे. रिंगणाच्या मध्यभागी जाऊन तो अश्वत्थाम्याच्या दातावर आपला हात घासतो.)

**कृतवर्मा:** हत्ती भाल्यासारखा असतो.

(सैनिक खिदळतात. कृतवर्मा बाजूला होऊन सीनूच्या डावीकडे स्तब्ध उभा राहतो. कृपाचार्य, संजय, मयाहुर, सीनू आणि कृतवर्मा हळूहळू अस्वस्थपणे हलू लागतात. नीट दिसत नसल्यामुळे त्यांना एकमेकांचा अडथळा होऊ लागतो आणि अस्वस्थता वाढत जाते. आता पाचहीजण घोळका करून एका ठिकाणी जमतात आणि एकमेकांशी भांडण करण्याचा मूकाभिनय करू लागतात. सैनिक मोठ्याने खिदळताहेत. भांडण विकोपाला पोहोचताच अश्वत्थामा उठून उभा राहतो, आणि सोंड पुढे काढून एकेकाच्या रुमालाची गाठ मागून सोडवत जातो. पाचहीजण मागे वळून अश्वत्थाम्याकडे चकित होऊन पाहिल्याचा अभिनय करतात.)

**कृपाचार्य:** अरेच्चा! आता समजलं! अख्खा हत्ती सुपासारखा नसतो.

**संजय:** मलाही समजलं! अख्खा हत्ती तुळईसारखा नसतो.

**मयाहुर:** मलापण समजलं! अख्खा हत्ती दगडासारखा नसतो.

**सीनू:** मलासुद्धा समजलं!  अख्खा हत्ती सापासारखा नसतो.

**कृतवर्मा:** मलादेखील समजलं! अख्खा हत्ती भाल्यासारखा नसतो.

(पाचहीजण एकमेकांची गळाभेट घेतात.)

**अश्वत्थामा:** सैनिकांनो! ह्या प्रसंगातून तात्पर्य निघतं ते असं की हत्ती सुपासारखा, तुळईसारखा, दगडासारखा, सापासारखा आणि भाल्यासारखा अंशाअंशाने जरी असला तरी पुरता नसतो. आणि म्हणूनच कोणत्याही गोष्टीबद्दल मत बनविण्यापूर्वी तिचा सर्वांगीण विचार करा. ज्याच्याशी आपलं दुमत

असेल त्याच्याशी मुद्दाम बोलणं काढा, जेणेकरून तुमचे पूर्वग्रह विरून जातील आणि तुम्हाला सम्यक ज्ञान होईल.

(सैनिक जोराने टाळ्या वाजवतात. कृपाचार्य, संजय, मयाहुर, सीनू, कृतवर्मा आणि अश्वत्थामा पुढे येऊन सर्वांना नाटकीपणे नमस्कार करतात आणि रिंगणाबाहेर पडतात. खाली पडलेले पाच रुमाल उचलून घेण्यासाठी सैनिकांची झुंबड उडते. 'अरे! अरे!' असं सीनू ओरडतेच आहे, तेवढ्यात ते सगळे गायब होतात. एक ढोलकीवाला आणि एक शीघ्रकवी आता रिंगणात उतरतात, तसं सैनिकांचं लक्ष तिकडे वेधलं जातं. हा शीघ्रकवी जाताजाता संजयकडे पाहून ओळखीने नमस्कार करतो.)

**संजय** (शीघ्रकवीला उद्देशून): मोकाट सुटू नकोस.

**शीघ्रकवी:** नाही. तसा जपून वागेन. पण उत्स्फूर्त रचना करायची म्हणजे कधीकधी तोल जातोच. त्यातच मजा असते.

(हे सहाजण गलक्यापासून हळूहळू दूर जातात.)

**अश्वत्थामा**: (चाचरत) तात्पर्य मी बरोबर सांगितलं ना? मला खात्री वाटत नव्हती.

**कृपाचार्य:** हो, बरोबर सांगितलंस. पण शेवटी ती एक लोककथा आहे. अमुक तात्पर्य तिच्यातून निघतं अशी परंपरा ठरून गेलेली आहे. ती आपण जशीच्या तशी पाळावी हेच उत्तम.

**अश्वत्थामा:** म्हणजे?

**कृपाचार्य:** म्हणजे असं की कथेचं तात्पर्य काय असायला हवं हे स्वतंत्र बुद्धीने ठरवायला गेलं तर उगीच गोंधळ वाढत जातो. त्यापेक्षा ते आपलं घोकून म्हणून टाकावं. उदाहरणार्थ असं पाहा की सर्वांगीण विचार हत्तीचा करणं सोपं आहे, कारण त्याचं भलंथोरलं अंग समोर दिसतच असतं. पण प्रत्यक्ष व्यवहारात ज्यांचा करावा लागतो त्या अमूर्त संकल्पना असतात. त्यांना किती अंगं असतील याची मोजदाद अवघड असते आणि ती सगळी आपण तपासलेली आहेत ह्याचा भरवसा नसतो. आणि म्हणूनच त्यांचा सर्वांगीण विचार इतक्या सहज करता येत नाही.

**कृतवर्मा:** आणि त्याचबरोबर असंही आहे की डोळ्यांवर बांधून घेतलेला रुमाल पटकन काढता येतो. पण व्यवहारात आंधळ्या माणसाला डोळस करता येत नाही. तेव्हा तू सांगितलेलं तात्पर्य एक तत्त्व म्हणून जरी वाईट नसलं तरी ह्या कथेतून नेमकं सिद्ध होत नाही.

**मयाहुर:** समजलं. म्हणजे निदान ह्या चर्चेचं तात्पर्य असं की सर्वांगीण विचार जरूर करावा पण लोककथांचा करू नये.

**सीनू:** जाऊ द्या रे! (अश्वत्थाम्याला उद्देशून) तुझं काम बाकी तू छान केलंस. पाव घटका विरंगुळा झाला यात सगळं आलं. माझे पाच रुमाल तेवढे गेले.

**मयाहुर:** बाकीचे चार दिसत नाहीत, पण पांढरा समोर दिसतो आहे.

**सीनू:** कुठे?!

**मयाहुर:** तो बघ. त्या माणसाच्या डोक्यावर आहे.

(समोर एक सैनिक दिसतो. पांढरा रुमाल दुमडून दोन कोपरे दोन कानांमागून वर येतील अशा प्रकारे त्याने तो डोक्यावर थापला आहे. तो खाली पडू नये म्हणून रुमालाला दोन भोकं पाडून त्यांच्यामधून एक बाण केसांत आरपार ओवला आहे. त्याच्या बाजूने चालणाऱ्या सैनिकाने पाठीला ढाल बांधून घेतली आहे.

**कृतवर्मा:** (दोघांना उद्देशून) हा काय प्रकार आहे?!

**पाठीवर ढाल घेतलेला सैनिक:** आम्हाला कंटाळा आला आहे. वेळ चांगला जावा म्हणून ससा आणि कासवाची शर्यत हे सूत्र धरून आम्ही एक नाट्यप्रयोग करणार आहोत. प्रयोग असा आहे की कुरुक्षेत्रातून मी धीम्या गतीने उलटासुलटा चालत राहणार. त्यातला काही वेळ ससा माझ्या सोबतीला असेल, आणि तेव्हा आम्ही दोघे गप्पाटप्पा, हास्यविनोद असं काहीबाही करत राहू. ऐकणाऱ्यांची करमणूक व्हावी असा उद्देश आहे. गप्पांना अध्येमध्ये मुद्दाम थोडं गंभीर वळण लावू, आणि ह्यामुळे आपल्या बुद्धीला आता शीण आला आहे असा अभिनय करून ससा तिथल्या तिथे झोपून जाईल. मी एकटाच पुढे जाईन आणि नुकत्याच सुरू केलेल्या गंभीर विषयावर अंतर्मुख होऊन स्वगत बोलत राहीन. थोड्या वेळाने सशाला जाग येईल आणि पळत येऊन तो मला गाठेल, तशा आमच्या गप्पा पुन्हा सुरू होतील. असा एकूण विचार आहे.

प्रयोगाला निश्चित संहिता नाही, ज्या वेळी जसे संवाद सुचतील तसे आम्ही बोलू. जे उत्स्फूर्तपणे जमेल ते खरं. शर्यत मी जिंकणार असल्यामुळे माझी इच्छा होईल तेव्हा खेळ थांबेल.

**कृतवर्मा:** ठीक आहे! काय वाटेल ते करा. पण नंतर आपापल्या गणात परत जा. सैन्याला शिस्त पाहिजे.

**सैनिक:** ती आता कशाला पाहिजे? नंतर घरीच जायचं आहे. येतो बरं का! (कासवासारखी मान हलवत निघून जातो. ससा त्याच्या पुढे दुडक्या चालीने पळत जातो.)

**सीनू:** नुसता थिल्लरपणा चालू आहे. जो तो म्हणतो नंतर घरीच जायचं आहे.

**कृपाचार्य:** ते साहजिक आहे. सुरवातीला जेव्हा अर्जुन आजारी झाला तेव्हा त्याच्याबद्दल दोन्हींही सैन्यांतून थोडीफार सहानुभूती होती. लढायला तो जे नको म्हणत होता ते प्रत्येकालाच मनातून थोडंसं म्हणायचं होतं, आणि त्यामुळे आपली लढाई अर्जुन लढतो आहे अशी एक सार्वत्रिक भावना होती. पण कृष्णार्जुनांची बडबड जी एकदा सुरू झाली ती काही केल्या थांबेना. हळूहळू सैनिक वैतागले. आणि नंतर जेव्हा अर्जुन पुन्हा जमिनीवर उताणा पडला, पुन्हा उभा राहिला आणि बडबड पुन्हा सुरू झाली तेव्हा मात्र ही सहानुभूती पुरती संपली. कधी हा प्रकार आटोपतो आणि कधी आपण घरी जातो असं ज्याला त्याला होऊन गेलं आहे.

**संजय:** हो, तो विषय मी काढणारच होतो. (घुटमळतो.) युद्ध रद्द होणार आहे आणि लवकरच आपण घरी जाणार आहोत असं सगळे समजताहेत. पण मला तशी शाश्वती वाटेनाशी झाली आहे.

**सीनू:** म्हणजे?

**संजय:** हा सगळा प्रकार आपण जितका मनावर घ्यायला हवा होता तितका घेतलेला नाही.

**सीनू:** असं का म्हणतोस?

**संजय:** आपण बरेच तर्कवितर्क केले. आपण म्हणालो की कृष्ण आणि अर्जुन यांचं काहीतरी साटंलोटं आहे आणि संगनमत करून ते दोघे वेळ काढताहेत. किंवा लहान मुलांची भाषा असते तशी ह्या दोघांनी गंमतीची भाषा बनवली आहे. फार धडपड करून अर्थ लावावा असं त्यात काही नाही. पण मला आता

ह्यातलं काहीच बरोबर वाटेनासं झालं आहे.

**कृपाचार्य:** मघाशी जेव्हा अर्जुन दुसऱ्या वेळेला जमिनीवर पडला तेव्हाच नेमका सीनूच्या गाड्याचा गोंधळ झाला, आणि आपलं लक्ष तिकडून उडालं ते उडालंच. त्यावेळी ह्या दोघांचं तिथे काय चाललं होतं ते नीट बघायला हवं होतं.

**संजय:** इथून मला जेवढं समजलं तेवढं सांगतो. नेहमीचा घोळ इथेही झालाच. म्हणजे अर्जुनाच्या मनात काय चाललं होतं ते मला नीट कळलं नाही आणि तो जे बोलला तेही पुसटच ऐकू आलं. पण अर्जुन खाली कसा पडला ते सांगतो. मी तुम्हाला आधी म्हणालोच होतो की कृष्णाच्या मते सगळं जग त्याने निर्माण केलेलं आहे. आपल्यापैकी कुणाला ते खरं वाटलं नाही, पण अर्जुनाला बहुतेक ते पटलेलं आहे. तर आता ह्या जगात कुठले पदार्थ आहेत आणि ते कसे तयार झाले हे मध्ये केव्हा तरी कृष्णाने अर्जुनाला सांगितलं. तो तपशील फार किचकट आहे आणि मलाही नीट समजलेला नाही, म्हणून सध्या राहू दे. पण कृष्णाचं म्हणणं असं की हे सगळे पदार्थ मिळून जे काही जग बनतं ते माझ्या अंगात सामावलेलं आहे. अकरावा अध्याय जेव्हा ह्या दोघांनी सुरू केला तेव्हा अर्जुनाने विचारलं की मला तसं दिसत का नाही? यावर कृष्ण म्हणाला की साध्या डोळ्यांनी तुला ते दिसणार नाही, तेव्हा मी तुला दिव्यचक्षू देतो. याच वेळी अर्जुन जमिनीवर उताणा पडला. यापुढे त्याला जे काही दिसलं ते मला दिसलं नाही, पण त्याची प्रतिक्रिया काय झाली तेवढं तुम्हाला सांगतो.

**कृतवर्मा:** मला इथून काहीसुद्धा दिसलं नाही. संजयला दिव्यदृष्टी दिली आहे आणि अर्जुनाला दिव्यचक्षू दिले आहेत. आम्हा पामरांना कुणी काही देत नाही.

**संजय:** अर्जुन कृष्णाला उद्देशून म्हणाला की तुला कितीतरी डोळे, कितीतरी तोंडं, कितीतरी दाढा, कितीतरी पोटं, कितीतरी मांड्या आणि कितीतरी पाय आहेत असं मला दिसतं आहे –

**कृतवर्मा:** म्हणतोस काय?!

**संजय:** आणि तुझ्या अंगातून कसलातरी वेगळाच सुगंध येतो आहे.

**कृतवर्मा:** म्हणजे त्याला नुसते दिव्यचक्षू दिले नसणार. दिव्यनासिकाही दिली असणार. मला तरी इथून तो म्हणतो तसं काही दिसलंही नाही किंवा कसला सुगंधही आला नाही. हत्तीघोड्यांनी कंटाळून जाऊन

शेणामुताचे जे सडे इथेतिथे टाकले आहेत त्यांची दुर्गंधी मात्र येते आहे. तेही जगाचाच भाग आहेत. असं असूनही कृष्णाच्या अंगातून तो वास का आला नाही हे मला समजत नाही.

**अश्वत्थामा:** तुम्हा माणसांना लढाईसाठी हत्तीघोडे राबवून घ्यायला हवेत, पण त्यांचा वास नको. कृतघ्न आहात.

**मयाहुर:** वासाचं एक राहू दे, पण जग निर्माण करणाऱ्याला कितीतरी मांड्या आणि कितीतरी पाय का असावेत? मडकी तयार करण्यासाठी पायांनी माती मळतात तशी जग ही काही मळून तयार करायची वस्तू नव्हे.

**संजय:** पुढे ऐका. अर्जुन कृष्णाला म्हणाला की तुला ही जी कितीतरी तोंडं आहेत त्यांच्यात कौरवसैनिक शिरून तुझ्या दाढांखाली चिरडले जाताहेत, आणि ह्या सगळ्यांचा चट्टामट्टा करून तू जिभल्या चाटतो आहेस असं मला दिसलं. ह्यावर कृष्ण म्हणाला की कौरवसैनिक दुष्ट आहेत, आणि ते मरावेत असं मी ठरवूनच टाकलेलं आहे. त्यांची जी वासलात शेवटी लागणारच आहे, ती तुला आधी दिसली. आता तू फक्त निमित्ताला पुढे हो आणि आपल्या हाताने त्यांना मारून टाक.

**कृपाचार्य:** 'निमित्ताला पुढे हो' म्हणजे काय?!

**संजय:** मला माहित नाही. व्हायचं ते आधीच होऊन गेलेलं आहे, तू फक्त त्याचं श्रेय घे असा अर्थ असावा.

**कृतवर्मा:** पण समजा अर्जुन निमित्ताला पुढे झाला, तर त्याला काही हातपाय हलवावे लागणार आहेत की आम्ही कौरव आपसूक समोर येऊन त्याच्यासमोर मान उतरून देणार आहोत? कारण तशा काही सूचना आम्हाला मिळालेल्या नाहीत. आणि याउलट समजा अर्जुन म्हणाला की मी निमित्ताला पुढे व्हायला नकार देतो आहे, तर काय? मग अशा परिस्थितीत कौरव मरणार की नाही?

**सीनू:** कृष्ण काहीच्या बाही बोलतो आहे! ह्या 'निमित्ताला पुढे हो' मध्ये काही अर्थ नाही.

**कृपाचार्य:** इथे मला धोका असा दिसतो की कृष्ण काहीच्या बाही जरी बोलत असला तरीदेखील अर्जुनाला जर ते पटलं तर तो युद्धाला तयार होईल. मग काही आपण लवकर घरी जाणार नाही.

**संजय:** अर्जुनाचा आविर्भाव मला तसाच दिसला. कृष्णाच्या कितीतरी मांड्या आणि कितीतरी दाढा बघून तो सटपटलेला दिसला. लाचार होऊन त्याने कृष्णासमोर धुळीत लोळण घेतली आणि 'बाबारे! तुला मित्र समजून तुझ्या गळ्यात गळे घातले हे माझं चुकलं!' अशी सपशेल माफी मागितली. अर्जुन पुरता कह्यात आला आहे असं बघून कृष्णाने सगळा देखावा विझवून टाकला, तेव्हा कुठे अर्जुन पुन्हा उठून बसला. आता ह्या सगळ्याची काय संगती लावायची ते तुम्ही सांगा. माझा तर्क चालत नाही.

(भिल्ल आणि गवळणीची एक अश्लील कथा ढोलकीच्या तालावर रचून सांगणाऱ्या शीघ्रकवीचा आवाज दूरवरच्या रिंगणामधून अजूनही ऐकू येतो आहे. पण तिथली गर्दी आता रोडावत चालली आहे. कृपाचार्य, कृतवर्मा, संजय, अश्वत्थामा, मयाहुर आणि सीनू ह्या सहाजणांभोवती आता सैनिकांचं नवं रिंगण तयार झालं आहे. सारेजण दाटीवाटीने बसून लक्षपूर्वक ऐकताहेत.)

**मयाहुर:** पुष्कळदा होतं काय की हृदयात खोल रुतून बसलेल्या इच्छा वेडंवाकडं रूप घेऊन बाहेर येतात. इथे हेच झालेलं आहे. अर्जुनाला बहुतेक राज्य मिळवण्याचा हव्यास आहे, पण कौरवांना मारल्याखेरीज ते मिळणार नाही. कौरव हे त्याचे चुलतभाऊ असल्यामुळे त्यांना मारवत तर नाही. तेव्हा अशा वेळी पळवाट काय? तर त्यांना मारण्याचा निर्णय दुसऱ्या कुणीतरी परस्पर घेतलेला आहे, ती जबाबदारी आपल्यावर नाही, आपण निमित्त आहोत अशी मनाची समजूत करून घेणं. माणसं जेव्हा वाईट वागतात तेव्हा आपण जे केलं ते हुकमाचे ताबेदार होतो म्हणून केलं असं त्याचं समर्थन करतात. त्यामुळे मनाला अपराधाची बोच लागत नाही आणि व्हायचं ते काम होऊनही जातं.

**कृतवर्मा:** म्हणजे तुला नेमकं काय म्हणायचं आहे? हे दिव्यचक्षू मिळाल्यानंतर अर्जुनाला जे काही दिसलं तो त्याच्या मनाने तयार केलेला देखावा होता की त्याला काय दिसावं हे कृष्णाने ठरवलेलं होतं?

**मयाहुर:** हे दिव्यचक्षू खरोखरीच आहेत यावर माझा विश्वास नाही. कुठलीही वस्तू आपल्याला कशी दिसते? त्या वस्तूवर प्रकाश पडून नंतर आपल्या डोळ्यांत शिरतो, आणि डोळ्यांतून ती संवेदना रक्तावाटे हृदयात पोहोचल्यानंतर आपल्याला वस्तू दिसते. पण वस्तू जर समोर नसेलच तर तिच्यावर प्रकाश पडणार नाही, आणि अशा प्रसंगी तुमचा चक्षू कितीही दिव्य असला तरी प्रकाशाअभावी काही करू शकणार नाही. संजयलादेखील दूरचं दिसतं पण नसलेलं दिसत नाही. कृष्णाच्या ह्या कितीतरी जिवण्या आणि कितीतरी दाढा अर्जुनासमोर प्रत्यक्ष नव्हत्या हे उघड आहे, कारण असत्या तर आपल्यालाही दिसल्या असत्या. म्हणून म्हणतो की 'तुला दिव्यचक्षू देतो आहे' ह्याचा शब्दश: अर्थ घ्यायचा नाही. कृष्णाने अर्जुनाला दिलेली ती एक प्रकारची परवानगी आहे. तुझ्या मनात कितीही वेड्याविद्र्या कल्पना असल्या

तरी त्या बाहेर आणायची लाज बाळगू नकोस, कारण खरं म्हणजे त्या तुझ्या मनात नाहीतच, त्या बाहेरच्या जगात आहेत आणि दिव्यचक्षूंमुळे तुला दिसताहेत, असं तो अर्जुनाला आडून सांगतो आहे. अर्जुनासाठी हे सोयीचंच आहे.

**कृपाचार्य:** तसंही असेल. मयाहुराचं मत मला पटत नाही असं नाही. पण माझीही एक कल्पना ऐकून घ्या. हा जो प्रकार चालू आहे त्याच्याकडे आपण एक हत्ती म्हणून पाहायला हवं. म्हणजे त्याचा सर्वांगीण विचार करायला हवा. तसा तो आपण अजून केलेला नाही. आपण असं समजून चाललो आहोत की कृष्ण एकतर खोटं बोलतो आहे किंवा निरर्थक बोलतो आहे. पण जे काही तो बोलतो आहे ते खरं असेल ही शक्यता आपण विचारात घेतलेली नाही. ती घ्यायला हवी.

**अश्वत्थामा:** कल्पना उत्तम आहे. मघाशी मी जे तात्पर्य सांगितलं त्याचा रोख हाच होता.

**मयाहुर:** पण कृष्ण खरं बोलतो आहे असं समजलं तर सगळं चित्रच बदलेल.

**कृपाचार्य:** तसं वादाखातर समजायचं. ते संयुक्तिक नाही असं लक्षात आलं तर सोडून द्यायचं.

**मयाहुर:** ठीक आहे, पण मग हे काळजीपूर्वक करायला हवं. कृष्ण जे म्हणाला त्याची फोड करून पाहायला हवी. (धुळीत खाली बसतो आणि बोटाने जमिनीवर लिहू लागतो.)

(१) कृष्णाने जग निर्माण केलेलं आहे.

(२) एखाद्याने मरावं हे ठरवण्याचा नैतिक अधिकार त्याला आहे.

कृपाचार्यांचा प्रस्ताव असा की ही विधानं आपण तात्पुरती मान्य करावीत. पण वास्तविक हे दोन मुद्दे स्वतंत्र आहेत. ह्यातलं पहिलं विधान खरं आहे असं जरी गृहीत धरलं तरी दुसरं खरं आहे असा निष्कर्ष आपोआप निघत नाही. कृष्णाने जग निर्माण केलंच असेल तर कौरवही निर्माण केले आहेत हे कबूल. पण जो वस्तू निर्माण करतो तो तिचं काहीही करू शकतो असं नाही. तेव्हा त्यांनी सरसकट युद्धात मरून जावं हे ठरवण्याचा अधिकार त्याच्याकडे कुठून आला हे मला समजत नाही. याउलट कृष्णाने जग नसेल जरी निर्माण केलं तरीदेखील युद्धात कुणी जिंकावं आणि कुणी मरावं हे ठरवण्याचा अधिकार काही कारणाने त्याच्याकडे आलाही असू शकेल. पण असं कुठलंच कारण त्याने जाहीर केलेलं नाही.

**कृपाचार्य:** नाही, आत्तापर्यंत ह्यातलं काहीच स्पष्ट झालेलं नाही.

**मयाहुर:** पण ते काही असलं तरी पहिला मुद्दा मला सध्या तरी गौण वाटतो. जग कुणी निर्माण केलेलं आहे ह्याची पंचाईत आपल्याला नंतर करता येईल. पण कौरवांनी मरावं असं जर कृष्णाने ठरवून टाकलं असेल आणि हे खरं करण्याची ताकद त्याच्यामध्ये असेल तर तुम्हाला असलेला धोका उघड आहे. मी आणि सीनू इथून केव्हाही बाहेर पडू शकतो, पण तुमचं तसं नाही.

(हे ऐकून भोवताली जमलेले सैनिक कुजबुजू लागतात. 'आपण मरणार का?', 'अजून नक्की नाही', 'सेनापती काय म्हणताहेत ते बघूया', 'हो, बघा आणि लवकर सांगा' अशासारखे आवाज निघतात. एक सैनिक अर्धवट स्वत:शी पण मुद्दाम मोठ्याने म्हणतो, 'पण निदान मुहूर्त नीट ठरवायचा होता. तेवढीही आमची काळजी कुणाला नाही.')

**कृतवर्मा:** कोण म्हणतंय ते? तुमची काळजी मला आहे. मी यादवांचा सेनापती आहे.

**तोच सैनिक:** नाही, त्याबद्दल आम्हाला शंका नाही. पण मला एक प्रश्न विचारायचा आहे. परिस्थिती अशी आहे की आपण बाकीचे कौरव लगेच मरू, पण भीष्म नाही. तो आपल्या सोयीने मरेल. मग माझा प्रश्न असा की ही सोय आम्हा सगळ्यांचीच का नाही केली?

**कृतवर्मा:** म्हणजे?

**सैनिक:** भीष्म मागे आम्हाला म्हणाला होता की माझ्या मरणाची वेळ मी स्वत: ठरवू शकतो. सध्या दक्षिणायन चालू आहे. मरायला ही वेळ शुभ नाही. उत्तरायण जास्त शुभ आहे. तेव्हा भीष्माने आम्हाला सांगितलं की मी युद्धात जखमी झालो तरी तडकाफडकी मरायला राजी होणार नाही. कुरुक्षेत्रात तसाच एका बाजूला पडून राहीन आणि उत्तरायण आलं की माझा मी शुभ वेळेला मरेन. आता हे उत्तरायण केव्हा सुरू होणार ते कुणालाच छातीठोक माहित नाही. काहीजण म्हणतात संक्रांतीच्या दुसऱ्या दिवशी सुरू होणार. काहीजण म्हणतात रात्रीच्या आकाशात चांदण्यांनी बनलेला जो मेंढा दिसतो तिथून सूर्य गेला की सुरू होणार. काहीजण म्हणतात की तो ठोकताळा पूर्वी बरोबर होता, पण सूर्याला अलिकडे दरवर्षी थोडा थोडा उशीर व्हायला लागला आहे. त्यामुळे तो मेंढ्याजवळून नव्हे तर माशाजवळून गेला की सुरू होणार. आता ह्यातलं काहीही खरं असलं तरी आपलं युद्ध अठराच दिवस चालणार आहे. तेवढ्यात काही हे

उत्तरायण सुरू होत नाही. तेव्हा ह्या युद्धात जर आम्ही मरणार असू तर हटकून अशुभ वेळेलाच मरणार. भीष्म जसा ताणून धरू शकतो तसं आम्ही कुणी करू शकत नाही. मग आता माझा प्रश्न असा की युद्ध उत्तरायणातच का नाही ठेवलं? म्हणजे आपण सगळेच शुभ वेळेला मेलो असतो. सेनापतीने आपल्या सैनिकांसाठी निदान एवढं करायला नको का?

**कृतवर्मा:** तू म्हणतोहेस त्यातलं मला काहीच माहित नव्हतं.

**मयाहुर:** मलाही माहित नव्हतं. युद्ध केव्हा होणार ती तिथी मला सांगितलेली होती, आणि त्याप्रमाणे सगळ्या सोयी वेळेत झाल्या पाहिजेत अशा सूचना मला दिलेल्या होत्या. मरणाऱ्यांसाठी अंत्यसंस्कारांची सोय यात आहे. पण अशुभ वेळेला माणूस मेला तर अंत्यसंस्कार वेगळे असतात का हे आता मला शोधून काढायला हवं.

**कृतवर्मा**: (सैनिकाला उद्देशून) तुझा आक्षेप बरोबर आहे, पण मला या क्षणी निश्चित काही सांगणं शक्य नाही. युद्धाचे नियम ठरवण्यात माझा सहभाग होता, पण ते केव्हा होणार हा निर्णय माझ्या हाती नव्हता. त्यामध्ये कुठेतरी गलथानपणा झालेला दिसतोय. मी चौकशी करून सांगतो काय ते. (ह्या उत्तराने सैनिकांचं समाधान झालेलं दिसत नाही, पण ते गप्प राहतात.)

**मयाहुर:** पण वेळ शुभाशुभ कशीही असली तरी माझं म्हणणं तेच आहे. आपण तातडीने विचार करायला हवा तो दुसऱ्या मुद्द्याचा. तुम्ही कौरवांनी मरावं हे ठरवण्याचा नैतिक अधिकार कृष्णाला कसा मिळाला असेल? आणि त्यातदेखील इतकी माणसं मारण्यासाठी मुद्दाम अशुभ वेळ निवडणं हे जखमेवर मीठ चोळण्यासारखं आहे. अर्थात असा अधिकार त्याच्याकडे आहे असं मी वादाखातर गृहीत धरलेलं आहे; तो खरोखरीच आहे का हे मला ठाऊक नाही.

**कृतवर्मा:** तू 'नैतिक अधिकार' म्हणतो आहेस. म्हणजे ज्याच्यामागे नैतिक अधिष्ठान आहे असा अधिकार. पण नैतिकता हा जगाचाच भाग आहे. समजा कृष्ण म्हणाला की जग मीच निर्माण केलं असल्यामुळे नैतिकतेचे नियम मला लागू होत नाहीत, तर काय उत्तर देणार? थोडक्यात तो असं म्हणू शकतो की हा अधिकार मी हातात घेतला म्हणून माझ्याकडे आहे. मला विचारणारे तुम्ही कोण?

**कृपाचार्य:** पण तो तसं म्हणताना दिसत नाही. आपल्या निर्णयाचं काहीतरी स्पष्टीकरण द्यायला हवं असं त्यालाही वाटत असणार, कारण आपण कौरवसैनिक दुष्ट असल्यामुळे मरणार आहोत असं तो अर्जुनाला

म्हणतो आहे.

**अश्वत्थामा:** (ठामपणे) मी दुष्ट नाही. कौरवांच्या सैन्यात मी स्वेच्छेने आलेलो नाही, आणि असलं गैरलागू विशेषण मी स्वत:ला चिकटवून घेणार नाही. मी इथला नव्हे. इथियोपियाच्या माळरानावर माझा जन्म झालेला आहे. एक दिवस जंगलात फिरत असताना मला जमिनीवर बरीच पानं पडलेली दिसली. हा काय प्रकार आहे ते पाहायला मी पुढे झालो आणि खोल खड्डयात तोंडघशी पडलो. अर्धवट तुटलेली झाडाची मुळी माझ्या कपाळात घुसली. मला दोरखंडांनी जखडून ओढून काढण्यात आलं आणि आक्सूमच्या बाजारात विकून टाकण्यात आलं. एकामागून एक असे माझे अनेक मालक झाले. प्रेमळ असा त्यांतला एकही निघाला नाही. भारतात मोठं युद्ध होणार अशी वदंता जेव्हा पसरली तेव्हा सगळीकडे हत्तीघोड्यांचे भाव वधारले. माझ्या तेव्हाच्या मालकाला लोभ सुटला आणि त्याने मला फुंकून टाकलं. पराण्या टोचून सहाशे योजनं चालवत मला इथे आणण्यात आलं. भारतातले हत्ती मला सामावून घेत नाहीत. त्यांच्यापेक्षा माझं वजन जास्त आहे, त्यांच्यापेक्षा माझे कान मोठे आहेत, आणि त्यांच्यापेक्षा माझी कातडी सुरकुतलेली आहे. ते मला उपरा समजतात आणि घाबरतात. मला इथे करमत नाही. ह्या युद्धातून मी बाहेर पडेन का ते मला माहित नाही, पण मी दुष्ट होतो म्हणून मेलो असं म्हणू नका.

**सीनू:** खरं तर जग तुझ्याशी दुष्टपणे वागलेलं आहे.

**अश्वत्थामा:** ते तुम्ही ठरवा. मी हत्ती आहे. मी काही विसरत नाही, पण आठवणींचे कढ काढून रडतही बसत नाही.

**कृतवर्मा:** दुष्ट मीही नाही आणि माझे सैनिकही नाहीत. आम्ही कुणीही इथे स्वेच्छेने आलेलो नाही. ह्या कृष्णाची जगावरच नव्हे तर भाषेवरही सत्ता असावी. कुठलाही शब्द कुठल्याही अर्थाने तो वापरू शकत असावा. जर मी कुणाला दुष्ट म्हणालो तर तसं का म्हणालो हे सांगण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडते. तो शब्द ज्या अर्थाने मी वापरतो आहे तो समोरच्याला पटला नाही, तर दोघांनाही मान्य होईल असा अर्थ शोधण्याचा प्रामाणिक प्रयत्न आम्हाला करावा लागतो. कृष्णाचं तसं नसावं. कुणालाही तो काहीही म्हणू शकतो.

**कृपाचार्य:** पण म्हणजे गोळाबेरीज परिणाम तोच झाला. माणूस काय किंवा हत्ती काय, कुणालाही विनाकारण दुष्ट ठरवून मारणं आणि कारण न देता मारणं ह्यात मला फरक दिसत नाही.

**सीनू:** मला हे सगळं चुकीचंच वाटतं. का ते उदाहरण घेऊन सांगते. चीनमध्ये एक खेळ चालतो. लाकडाची एक सपाट चौकोनी फळी घेतात आणि तिच्यावर आडव्या उभ्या रेषा आखून घरं बनवतात. घरांना आलटून पालटून लालपिवळे रंग देतात. फळीच्या एका बाजूला एक खेळाडू बसतो आणि दुसऱ्या बाजूला दुसरा खेळाडू बसतो. घरांमध्ये हस्तिदंती सोंगट्या ठेवतात. डुक्कर, अजगर, वेश्या, भाला, गोगलगाय, व्यापारी असे सोंगट्यांचे वेगवेगळे आकार असतात. कुठली सोंगटी कशी हलते आणि कुठल्या सोंगटीची ताकद किती ह्याचे ठरलेले नियम आहेत. भाला तिरका जातो आणि डुक्कर अजगरावरून उडी घेऊ शकतो. गोगलगाय एक घर डावीकडे, उजवीकडे किंवा समोर जाऊ शकते. अजगर डुकराला गुदमरून मारू शकतो आणि भाला वेश्येला भोसकू शकतो. वेश्या व्यापाऱ्याला विष घालू शकते. आणखी खूप नियम आहेत. समोरच्या गोगलगाईला जो मारेल तो डाव जिंकला. खेळणारे हुशार असतील तर गुंतागुंत वाढत जाते आणि अशा वेळी फार कौशल्य लागतं.

उत्तर चीनमधला एक राजा आणि त्याची आई अशा दोघांचा हा आवडता खेळ आहे. राजवाड्याच्या आवारात त्यांनी एक मोठा दगडी पट तयार करून घेतला आहे. मयाहुरानेच तो हवा तसा करून दिला आणि नंतर एकदा मला नेऊन दाखवला. दोन्ही बाजूंना दोन उंच मनोरे बांधले आहेत. एका मनोऱ्यात राजा आणि त्याच्या समोरच्या मनोऱ्यात आई असे बसतात, आणि खाली पटांगणात बघून खेळातल्या चाली ओरडून सांगतात. दरबारी मंडळी भोवताली बसून पाहात असतात. सोंगट्या म्हणून कैदी वापरतात. डुक्कराचं नाहीतर अजगराचं कातडं पांघरलेला, हातात भाला घेतलेला असे ते कैदी असतात. बाई कैदेत असेल तर तिला गडद रंग लावून वेश्या म्हणून उभी करतात. वेश्या जेव्हा व्यापाऱ्याला विषाचं मडकं देते तेव्हा त्याला ते एका घोटात पिऊन टाकावं लागतं. अजगरडुकराचं असंच असतं. डुकराला विरोध करायची परवानगी नसते. रक्त टिपून घ्यायला आणि प्रेतं उचलायला नोकर ठेवलेले असतात. यामध्ये बघणाऱ्यांना विरंगुळा होतो आणि कैद्यांना जो एवीतेवी मृत्युदंड द्यायचाच असतो तेही काम होऊन जातं.

पण विनाकारण माणसं मारू नयेत असा आईमुलाचा दंडक आहे. आपण डाव खात्रीने जिंकणार असं जर समजा आईला वाटलं, तर आपले पुढचे डावपेच काय असणार आहेत याची समोरच्या मनोऱ्यात निरोप्या पाठवून ती राजाला सूचना देते. ह्यातून आपण वाचत नाही असं जर राजाला वाटलं तर तो हार कबूल करतो आणि डाव तिथे संपतो. अशा वेळी जिवंत राहिलेल्या सोंगट्यांना घरी जाऊ देतात. उरलेल्या आयुष्यात कसलीही आगळीक त्या कधी करत नाहीत. राजाला नाही मान्य झालं तर डाव पुढे चालू राहतो, पण त्याला इलाज नाही.

इथेही काहीसं असंच आहे. रथीने अमुक करावे आणि पदातिने तमुक करू नये असे लांबलचक नियम तुम्ही बनवलेले आहेत. दगडावर कोरलेले मला समोरच दिसताहेत. पण कृष्ण म्हणतो आहे ते जर खरं असेल आणि सगळे कौरव जर मरणारच असतील, तर हे नियम आतून पोकळ आहेत आणि ही लढाई बनावट आहे. एवढं समजण्याइतकी अक्कल कृष्णाला असायला हवी. अर्जुनाला जे काही रूप त्याने दाखवलं ते वास्तविक सगळ्या कौरवांना जाहीरपणे दाखवायला हवं. त्यांना पटवून द्यायला हवं की लढाई करू नका, केलीत तर तुम्ही जगणार नाही. मग ते शरणागती पत्करतील आणि निमूटपणे घरी जातील. आपापल्या बायकामुलांशी यापुढे फार चांगले वागतील. विनाकारण माणसं मरायची यामुळे टळतील. कृष्णाने जग निर्माण केलेलं असेल तर कौरवांच्या मनावरही त्याचं नियंत्रण असायला हवं. त्यामुळे कौरवांना इतकं पटवून देणं त्याच्या शक्तीबाहेर असू नये.

**संजय:** सीनू, तू म्हणतेस ते पूर्णपणे मान्य आहे. पण कृष्ण असं काही करेल अशी चिन्हं दिसत नाहीत. अजूनही तो एकट्या अर्जुनाशीच बोलतो आहे.

**कृतवर्मा:** पण हेच मला कळत नाही. बोलण्यासारखं आता राहिलं काय आहे? युद्ध करायला हवं हे जर अर्जुनाच्या गळी उतरलेलं असेल तर तो लागलीच युद्धाला सुरुवात का नाही करत?

**मयाहुर:** तुम्हाला म्हटलं ना? हा सगळा एककल्लीपणा आहे. सांगायचं ते सांगून झालेलं आहे, पण कसे ना कसे तरी अठरा अध्याय करायचे असा कृष्णाने चंग बांधला आहे. तेव्हा भारुडभरती करण्याखेरीज त्याच्यासमोर दुसरा मार्ग राहिलेला नाही.

**संजय:** तसंच वाटतं. आता ह्या दोघांचा वेगळाच विषय चालू आहे. कृष्णाने जग निर्माण केलं असेल तर त्याची मर्जी सांभाळायला हवी हे अर्जुनाला कळलेलं आहे. म्हणून त्याने कृष्णाला विचारलं की तुला कशा प्रकारचा चेला पसंत आहे? कृष्ण म्हणाला की सर्वांशी मैत्री करून असणारा आणि कनवाळूपणे वागणारा चेला मला पसंत आहे. वास्तविक जर अर्जुनाचा पक्ष युद्ध खात्रीने जिंकणार असेल तर ही चर्चा करायला मागाहून खूप वेळ आहे. त्यात आत्ता शिरण्याची गरज नव्हती.

**कृतवर्मा:** कनवाळूपणे वागून युद्ध कसं करणार? अर्जुनाला हे युद्ध झाल्यानंतर सांगायला हवं. आधी नाही.

**संजय:** इतकंच नव्हे तर कृष्णाचं म्हणणं असं की सुख आणि दु:ख ह्या दोन्ही गोष्टी ज्याला सारख्याच आहेत, किंवा जय आणि पराजय याही गोष्टी सारख्याच आहेत असा चेला मला पसंत आहे.

**कृतवर्मा:** पुन्हा तेच म्हणतो. हे नंतर सांगायला हवं. जय आणि पराजय ह्यात जो फरक करत नाही अशा माणसाच्या लढण्यात कितीसा जोर असणार आहे?

**संजय:** कदाचित कृष्णाला असं म्हणायचं असेल की जय आणि पराजय आधी वेगवेगळे समजा, पण एकदा व्हायचं ते होऊन गेल्यावर सारखेच समजा. किंवा सुख आणि दु:ख वाटण्याआधी वेगवेगळे समजा पण नंतर सारखेच समजा.

**कृपाचार्य:** असं करणं अवघड आहे.

**मयाहुर:** अवघड नाही, अशक्य आहे. आणि सुखदु:ख आम्ही सारखेच समजावे अशी त्याची इच्छा असेल तर जग निर्माण करतानाच तशी तरतूद का नाही केली? एखादा चितारी असं कधी म्हणेल का की इथे मी जांभळा रंग दिलेला आहे आणि तिथे पोपटी दिलेला आहे, पण चित्राकडे बघताना तुम्ही ते सारखेच समजा?

**सीनू:** कृष्णाचा हा जो कोणी चेला असेल तो स्वत:चं सुख आणि स्वत:चं दु:ख सारखं समजतो आहे तोपर्यंत ठीक आहे. पण इतरांचं सुख आणि इतरांचं दु:ख जर तो सारखं समजू लागला तर आजूबाजूचे लोक लागलीच तक्रार नाही का करणार?

**कृपाचार्य:** हे सगळं कृष्णाने आधी सांगितलं असतं तर धर्मयुद्धाच्या नियमांत आपण तसे बदल करून घेतले असते. आम्ही असं म्हटलं असतं की 'ज्याचे शस्त्र नीट चालत नसेल किंवा चिलखत निकामी झाले असेल अशास ठार मारू नये. परंतु जय आणि पराजय ही आपल्याला सारखीच आहेत असे प्रतिस्पर्ध्याने आधी जाहीर केले असल्यास हे कलम लागू होणार नाही.' युद्ध लवकर संपायला यामुळे थोडी मदत झाली असती.

**कृतवर्मा:** आणि ह्या दोघांना जर वेळच काढायचा असेल तर निदान अर्जुनाचं आणि पर्यायाने आमचंही मनोरंजन होईल अशी काही सोय कृष्णाने करायला हवी. आमच्या द्वारकेला एक गप्पिष्ट म्हातारा आहे. त्याची नेहमीची युक्ती अशी की कुठल्याही घोळक्यात असला की तो माणसांचे तीन प्रकार पाडतो. एकदा तो म्हणाला की जगात तीन प्रकारचे लोक असतात. समुद्राकाठी रमणारे, पर्वतावर रमणारे आणि बाजारात रमणारे. आता ह्या बोलण्यात चातुर्य असं फार नाही, पण जमलेल्यांनी ह्यातून इतके वेगवेगळे लाक्षणिक अर्थ काढले की पुढच्या दोन घटका कशा गेल्या ते कुणाला कळलं सुद्धा नाही. कृष्णाला ह्यातून काही शिकण्यासारखं आहे.

**सीनू:** मीही तेच म्हणते. इथे तीन प्रकारचे सैनिक आहेत: लागलीच मरणारे, हाल होऊन मरणारे आणि धास्तीने मरणारे. हा समोरचा प्रकार असाच चालू राहिला तर बहुतेक सगळे तिसऱ्या वर्गात जमा होतील.

**संजय:** सीनू, हा विनोदाचा विषय आहे का?

**सीनू:** मग मी तरी काय करू? वेळ नको का जायला? लोक कंटाळलेले मला बघवत नाहीत.

**संजय:** सैनिक खरोखरीच मरणार आहेत, पण मला संशय असा आहे की ह्या मुद्द्याला कृष्णाच्या लेखी महत्त्व नाही. तुम्हाला मी जेव्हा इथे भेटलो तेव्हा पाचेक अध्याय होऊन गेलेले होते, आणि त्यांमध्ये कृष्ण पुष्कळ काही म्हणून गेला होता. ते सगळंच मला समजलेलं नाही, पण माणसं मारणं वाईट का नाही याचा त्यातून उलगडा होतोसं दिसतं. तुम्हालाही सांगतो, पटतं का बघा.

**कृतवर्मा:** सांग. पटलं तर चांगलंच होईल, कारण मग मला समाधानाने मरता येईल.

**संजय:** त्याआधी आत्मा म्हणजे काय हे तुम्हाला सांगायला हवं, तेव्हा थोडं सबुरीने घ्या. कृष्ण म्हणाला होता की आपल्या अंगात आत्मा नावाची काहीतरी वस्तू असते. तिच्यामुळे आपण जिवंत राहतो. आता एकतर ही वस्तू अंग सोडून गेली की आपण मरतो, किंवा आपण मेलो की ही वस्तू अंग सोडून जाते. दोहोंपैकी नक्की काय होतं याबद्दल अजून माझ्याच मनात गोंधळ आहे. पण ते काही असलं तरी आपण मेल्यानंतर हा आत्मा दुसऱ्या अंगात शिरतो आणि ते अंग जिवंत होतं. कृष्णाचं म्हणणं असं की माणूस जसा जुने कपडे टाकून देऊन नवे कपडे घालतो तसा आत्मा जुनं अंग टाकून देऊन नव्या अंगात शिरतो.

**मयाहुर:** हे महत्त्वाचं आहे. मला नीट समजून घ्यायला हवं. पण हा आत्मा अंगात राहून काय करतो?

**संजय:** कृष्णाने ते काही सांगितलं नाही. त्याने आत्म्याचं जे वर्णन केलेलं आहे ते आत्मा काय करत नाही आणि आत्म्याला काय होत नाही अशाच धाटणीचं आहे. कृष्ण म्हणतो की आत्म्याला हत्याराने इजा होत नाही, आग त्याला जाळू शकत नाही, पाणी त्याला भिजवू शकत नाही आणि वारा त्याला वाळवू शकत नाही. हे व्यापक अर्थाने घ्यायला हवं असं संदर्भावरून दिसतं. म्हणजे उदाहरणार्थ, तसं जरी स्पष्ट म्हटलं नसलं तरी आत्म्याला गंज चढत नसणार किंवा रुमालात बांधता येत नसणार.

**अश्वत्थामा:** मलाही आत्मा आहे का? तसं जाणवत तरी नाही.

**सीनू:** जाणवत मलाही नाही.

**संजय:** हो, प्राण्यांनाही आणि बायकांनाही असतो. माणूस मेल्यावर त्याचा आत्मा प्राण्यात जाऊ शकतो, प्राणी मेल्यावर माणसात जाऊ शकतो किंवा एका प्राण्यातून दुसऱ्या प्राण्यात जाऊ शकतो. तेव्हा आपल्या सगळ्यांमधले आत्मे एकमेकांपेक्षा निराळे नसावेत. ते परस्परांना कसे ओळखतात हे माहित नाही. वनस्पतींमध्ये असतो का हे मात्र नीट कळलं नाही. उदाहरणार्थ, वडाचं मोठं झाड असेल तर त्याचा काही भाग मेलेला आणि काही जिवंत असू शकतो. अशा वेळी त्यामधला आत्मा झाडाच्या काहीच फांद्यांमध्ये वावरू शकतो आणि काही फांद्यांमध्ये शिरायला त्याला मज्जाव आहे असंही असू शकेल. महत्त्वाचं असं की माणसाला किंवा प्राण्याला मारलं तरी त्याचा आत्मा मरत नाही. मेलेलं अंग सोडून तो दुसऱ्या अंगात निघून जातो. त्यामुळे कृष्णाचं म्हणणं असं की माणूस मेला तरी त्यात दु:ख करण्यासारखं काही नाही, कारण आत्म्याला त्यात कुठेच धक्का पोहोचलेला नसतो. आणि म्हणूनच कृष्ण अर्जुनाला म्हणतो की तू माणसं मारायला कचरू नकोस.

**मयाहुर:** हे खूपच महत्त्वाचं आहे. मला मुळातूनच समजून घ्यायला हवं. तू म्हणालास की माणूस आत्म्यामुळे जिवंत राहतो. असं जर असेल तर जिवंतपणी तो माणूस केव्हा काय करतो हे आत्मा ठरवत असणार.

**संजय:** नाही, तसं वाटत नाही. असं पाहा की आपल्या अंगात ज्या संवेदना निर्माण होतात त्या रक्तातून हृदयात वाहून नेल्या जातात. याबद्दल आपण मघाशी बोललोच आहोत. रक्तात खूप पाणी असतं. आत्म्याला जर पाणी भिजवू शकत नसेल तर आपल्या संवेदना त्याच्यापर्यंत पोहोचतच नसणार. म्हणजे समजा मला ह्या क्षणी थंडी वाजत असेल तर माझ्या आत्म्याला ते ठाऊक नसतं. आणि तेच जर ठाऊक नसेल तर थंडी भागावी म्हणून पुढे काही करण्याचा प्रश्न येत नाही.

**सीनू:** तुला खरंच थंडी वाजते आहे का?

**संजय:** थोडीशी.

(सीनू आपल्या गाड्यात जाऊन एक धाबळी घेऊन येते आणि संजयला आणून देते.)

**सीनू:** तूरानमध्ये एक दाट पांढरे केस असलेली गरगरीत मेंढी असते. समरकंदला तिच्या लोकरीचा मोठा बाजार भरतो. तिथून मी ही घासाघीस करून स्वस्तात मिळवली. ठेव तुझ्याजवळ.

(संजय ती आपल्याभोवती लपेटून घेतो.)

**संजय:** ऊब छानच आहे. धाबळी पाहिली की मला लहानपणची आठवण होते. आई आणि बाबांनी जोडीने म्हणायचं एक जुनं गाणं होतं. बाबा खोगीर पाठीवर बांधून घोडा व्हायचे आणि आई धाबळी पांघरून मेंढी व्हायची. मेंढी घोड्याची थट्टा करत असे की 'बाबारे! काय हे हाल तुझे! माणूस तुझ्या पाठीवर बसून तुला दामटतो आणि सामानाने भरलेले जड खटारे तुला ओढायला लावतो.' यावर उलट घोडा म्हणतो, 'बाई गं! किती हे हाल तुझे! तुझ्या अंगावर इतकी सुंदर लोकर असते, पण माणूस ती सगळी ओरबाडून घेतो आणि तुला नागडी करून सोडून देतो.' एक कडवं घोड्याचं आणि एक कडवं मेंढीचं असं ते चालायचं. समोर ऐकणारे कोण आहेत याचा अंदाज घेऊन हे गाणं कितीही आर्त बनवता येत असे. बायाबापड्यांच्या अंत:करणाला पीळ पाडता येत असे. तितकाच खुर्दाही जास्त मिळायचा.

**सीनू:** गाणं लिहून दे नंतर मला.

**संजय:** देईन.

**मयाहुर:** पण आपला विषय सोडूया नकोत. तुला आत्ता जेव्हा थंडी वाजली तेव्हा तुझ्या त्वचेतून हृदयाकडे रक्त गेल्यामुळे ती तुला कळली. पण तू जेव्हा तसं बोलून दाखवलंस, तेव्हा कशी हालचाल करायची हे तुझ्या ओठातल्या स्नायूंना कुणीतरी सांगितलं असलं पाहिजे. आणि नंतर स्वत:भोवती धाबळी लपेटून घेतलीस, तेव्हाही कशी हालचाल करायची हे तुझ्या हातातल्या स्नायूंना कुणीतरी सांगितलं असलं पाहिजे. पण हे सांगतं कोण?

**संजय:** आता ते मला काय ठाऊक? पण आत्मा सांगत नाही हे निश्चित. कारण मुळात थंडी वाजणं म्हणजे काय हेच त्याला समजत नाही आणि नंतर अंगाला ऊब मिळालेलीही समजत नाही. निदान कृष्णाच्या बोलण्यावरून तसा स्पष्ट तर्क करता येतो. असं सगळ्याच बाबतीत आहे. आत्म्याला दु:ख होत नाही आणि आनंदही होत नाही. त्याला तहान किंवा भूक लागत नाही. तेव्हा माणसाने काय खायचं आणि प्यायचं हे तो ठरवत नाही.

**कृपाचार्य:** ठीक आहे, पण मेलेली माणसं बोलत नाहीत किंवा हालचालही करत नाहीत. तू म्हणालास की जिवंत माणूस जिवंत असतो तो त्याच्यात आत्मा असल्यामुळे. पण जिवंत माणसाच्या कुठल्याच संवेदनेत आणि कुठल्याच हालचालीत तो भाग घेत नसेल तर आत्म्याचा उपयोग काय?

**मयाहुर:** मलाही हाच प्रश्न पडला होता. जिवंत माणूस जेव्हा मरेल तेव्हा ही अडचण येईलच. असं समज की कौरवांच्या बाजूचा धैर्यधर नावाचा एक सैनिक आहे. अर्जुनाने त्याच्या पोटात समज बाण मारला. परिणामी धैर्यधर भयंकर कासावीस होईल आणि त्याच्या अंगातलं रक्त जखमेतून बाहेर सांडायला लागेल. थोड्या वेळाने धैर्यधर मरेल. पण तू म्हणतोस की दुखल्याची संवेदना आत्म्याला कळत नाही आणि रक्ताशीही त्याचा संबंध येत नाही. पण मग धैर्यधराचं अंग केव्हा सोडून जायचं हे त्याच्या आत्म्याला कसं कळतं?

**कृतवर्मा:** आणि समज धैर्यधर एकदाचा मेला. आता त्याच्या आत्म्याला काही इजा झालेली नाही आणि तो दुसऱ्या अंगाच्या शोधात निघाला असेल हे मान्य. पण म्हणून धैर्यधराच्या बायकोने रडू नये असं मुळीच नाही. कारण तिचं प्रेम होतं धैर्यधरावर, त्याच्या आत्म्यावर नव्हे. आणि तो मेल्यामुळे वाईट वाटणार आहे ते तिला, तिच्या आत्म्याला नव्हे. तेव्हा तिने अर्जुनाच्या आत्म्याला शिव्या देऊ नयेत फारतर, पण अर्जुनाला द्यायला काहीच हरकत नाही. आणि असं असेल तर धैर्यधराला मारण्यासाठी अर्जुनाकडे सबळ नैतिक कारण हवं. त्याचा आत्मा मरत नाही हे कारण नव्हे.

**सीनू:** मला हे सगळं विचित्रच वाटतं. का ते संजयनेच दिलेलं उदाहरण पुढे चालवून सांगते.

**संजय:** माझं उदाहरण असं इथे काही नाही. मी पदरचं सांगितलेलं नाही. कृष्ण जे म्हणाला ते तसंच्या तसं तुम्हाला सांगतो आहे.

**सीनू:** हो रे! उगीच फुरंगटू नकोस. तर कृष्णानेच दिलेलं उदाहरण पुढे चालवून सांगते. माणूस जुने कपडे टाकून देऊन नवे घेतो. पण का घेतो? जुन्या कपड्यांचा रंग विटतो, ते फाटतात असं काही ना काहीतरी होतं. त्यामानाने नवे कपडे चांगले दिसतात. म्हणून माणूस नवे कपडे घेतो. पण आता इथे बघ. समज एक दिसायला छान मुलगी आहे. आपण तिला छान म्हटल्यामुळे तिला स्वत:ला आनंद होतो. पण यात तिच्या आत्म्याला काही फरक पडत नाही. पुढे ती म्हातारी झाली की आपलं सौंदर्य गेलं असं म्हणून खट्टू होते. पण यातही तिच्या आत्म्याला काही फरक पडत नाही. मग असं असेल तर हा आत्मा जुनं अंग टाकून देऊन नवं

अंग घेण्याचा खटाटोप कशासाठी करतो? तो नेहमी अंगाबाहेरच का राहात नाही? म्हणजे अंगाला आत्म्याचा उपयोग नाही एवढंच नव्हे तर आत्म्यालाही अंगाचा उपयोग नाही.

**संजय:** ह्यावर एक उत्तर आहे. म्हणजे कृष्णाने दिलेलं उत्तर आहे, मी नव्हे. माझ्यावर धार धरणार नसाल तर सांगतो.

**सीनू:** नाही धरत रे! घाबरू नकोस. तू आपला सांगत राहा.

**संजय:** हा जो आत्मा एका अंगातून दुसऱ्या अंगात आणि दुसऱ्या अंगातून तिसऱ्या अंगात जातो, तसं त्याला वास्तविक करायचंच नसतं.

**कृतवर्मा:** करायचंच नसतं?!

**संजय:** ह्या तोचतोचपणातून त्याला कायमची मोकळीक मिळवायची असते. याला मोक्ष म्हणतात. हा मोक्ष मिळाल्यानंतर आत्मा कायमचा कृष्णाजवळ जाऊन राहतो. आणि हा मोक्ष मिळावा यासाठी प्रत्येकाने प्रयत्न करायला हवेत असं कृष्णाचं म्हणणं आहे.

**कृतवर्मा:** म्हणजे काय करायला हवं?

**संजय:** बऱ्याच वेगवेगळ्या मार्गांनी मोक्ष मिळवता येतो असं दिसतं. ज्याचा जसा स्वभाव असेल तसा मार्ग त्याने निवडावा असं कृष्णाचं म्हणणं आहे. हे मार्ग कुठले ते मी तुम्हाला सांगूही शकेन, पण त्यात किचकटपणा खूप आहे. तरीदेखील ह्या सगळ्या मार्गांमधलं समान सूत्र असं की स्वत:चे चोचले पुरवायचे नाहीत. किमान एवढं पथ्य पाळायचं.

**सीनू:** म्हणजे काय करायचं?

**संजय:** उदाहरणार्थ, समज तुला आंबा आवडतो. तर तो खाल्ल्यामुळे जीभ चाळवते आणि आंबा आणखी खावासा वाटतो. तर अशा वेळी जिभेचं ऐकायचं नाही. एकतर आंबा आधी खायचाच नाही, किंवा खाल्ला तरी तो चवीला चांगला लागू द्यायचा नाही. असं सगळ्यांच बाबतीत आहे. समुद्र मी कधी पाहिलेला नाही, पण पाहणारे सांगतात की समुद्रात सूर्य मावळताना फार छान दिसतो आणि रोज त्या वेळेला पाय

तिथे ओढ घेतात. पण हे वाईट आहे, कारण जितक्या वेळा समुद्रावर जाल तितकी ही तलफ वाढत जाते. गाण्याचंही असंच आहे. चांगलं गाणं ऐकावं लागलं तर त्यात आनंद मानू नये. यामागचं कारण असं की जितक्या वेळा तुम्ही चवीने आंबा खाल, किंवा कान देऊन गाणं ऐकाल तितका तुमचा जगण्यावरचा लोभ वाढत जातो. पण यामुळे मोक्ष आणखी अवघड होतो, कारण जिवंत अंगापासून आत्म्याला दूर नेणं ह्याच उद्दिष्टाचा त्यात बोजवारा उडतो.

**कृतवर्मा:** पण मोक्ष कशासाठी मिळवायचा?

**संजय:** कृष्णाजवळ कायमचं जाऊन राहता यावं यासाठी.

(कृतवर्मा निश्वास सोडतो.)

**कृपाचार्य:** (कृतवर्म्याला उद्देशून) ह्या कल्पनेने तू हर्षभरित झालेला दिसत नाहीस.

**कृतवर्मा:** नाही. निखळ आनंद व्हावा असं ह्या प्रस्तावात मला काही दिसत नाही. यादवांचा मी सेनापती असल्यामुळे कृष्णाशी माझा अनेकदा जवळून संपर्क आलेला आहे.

**अश्वत्थामा:** कृतवर्म्याचं एक राहू दे. काही वैयक्तिक अनुभवांमुळे ही मोक्षाची कल्पना त्याला आकर्षक वाटत नसेल. पण माझी शंका वेगळी आहे. जेव्हा केव्हा मी मरेन तेव्हा माझा आत्मा माझ्या अंगातून बाहेर जाईल. बरोबर?

**संजय:** बरोबर.

**अश्वत्थामा:** तो कुठे जाईल ह्यावर माझं नियंत्रण नाही. कुठल्याही प्राण्याच्या किंवा माणसाच्या अंगात तो जाऊ शकेल.

**संजय:** बरोबर.

**अश्वत्थामा:** असं समजून चला की तो एका वेश्येच्या अंगात गेला. वेश्याच का समजायची याला कारण नाही, पण उदाहरणादाखल समजून चला. आता मी मेल्यानंतरच ही वेश्या जन्माला आलेली असल्यामुळे

तिची आणि माझी ओळख नसणार. एवढंच नव्हे तर तिने माझं नावही ऐकलेलं नसणार. तेव्हा मी म्हणेन की ह्या आत्म्याचं पुढे काय होतं हे त्या वेश्येने बघावं. त्याला मोक्ष मिळावा ह्यासाठी मी का म्हणून प्रयत्न करावेत? मी मेल्यावर माझा संबंध संपला.

**संजय:** ठीक आहे, हा तिढा सुटतो का बघूया. पण 'हा आत्मा' असं म्हणत राहणं त्रासाचं आहे. त्याला रीतसर नाव पाहिजे.

**मयाहुर:** आउटिस! आत्म्याला मी 'आउटिस' हे नाव सुचवतो. यवनांकडचा हा रुळलेला शब्द आहे. एखाद्याची ओळख नक्की नसेल तर ते त्याला 'आउटिस' म्हणतात.

**संजय:** हरकत नाही. तर अश्वत्थाम्याच्या आत्म्याचं नाव 'आउटिस'. आणि वेश्येचं नाव 'योजनगंधा'.

**कृपाचार्य:** व्यासाला टपली मारून जायची एकही संधी तू सोडत नाहीस. योजनगंधा हे त्याच्या आईचं, म्हणजे सत्यवतीचं टोपणनाव आहे.

**संजय:** तसं समजा. तर वेश्येचं नाव 'योजनगंधा'. सारांश काय तर अश्वत्थामा मेल्यानंतर त्याचं कलेवर सोडून देऊन आउटिस योजनगंधेच्या अंगात शिरेल. आता इथे कृष्णाचं म्हणणं असं की अश्वत्थाम्याने आपण अश्वत्थामा आहोत आणि योजनगंधेने आपण योजनगंधा आहोत असं समजू नये. तो भ्रम आहे. याउलट आपण आउटिस आहोत असं दोघांनी समजावं. आउटिसला जो मोक्ष मिळवायचा आहे त्यासाठी अश्वत्थामा आणि योजनगंधा ह्या दोघांनीही प्रयत्न करायला हवेत, कारण ते दोघेही आउटिस आहेत.

**सीनू:** (कपाळाला आठ्या घालत) हे शक्य नाही.

**कृतवर्मा**: (भुवया कुस्करत) नाही.

**अश्वत्थामा:** हे मुळीच शक्य नाही. मी आउटिस नव्हे. मी कोण आहे ते सांगणं माझ्यासाठी सोपं नाही; सांगायला गेलोच तर ढग चाचपडून पाहण्यासारखं ते होईल. पण मी आउटिस नव्हे इतकं उघड आहे. तुम्हाला म्हणालो होतो की इथियोपियाच्या जंगलात मी लहानाचा मोठा झालो. मला तिथल्या आठवणी आहेत आणि त्या आता माझा भाग झालेल्या आहेत. माझे मोठे कान मला आवडतात आणि माझी सुरकुतलेली कातडी मला आवडते, कारण आपण इथले नाही, आपल्याला इथे राहायचं नाही, एक ना एक

दिवस आपण इथियोपियात परत जाणार आहोत असा एक विश्वास त्यांच्यामुळे माझ्यापाशी आहे. खरा असो किंवा खोटा असो, पण आहे. माझे कान अधिक माझी कातडी अधिक माझ्या आठवणी, असं सगळं ओबडधोबड कडबोळं होऊन मी बनतो. योजनगंधेजवळ यापैकी काहीही नाही. माझ्या आठवणी तिला आठवणार नाहीत. योजनगंधेचे कान मोठे नसतील आणि योजनगंधेचं अंग सुरकुतलेलं नसेल. नाहीतर तिचा धंदाच चालायचा नाही. तिची स्वत:ची ओळख निर्माण करणारे तिच्या अंगचे अवयव वेगळे असणार. ते कोणते ह्यात मी शिरत नाही. पण असं पाहा की ह्या बिनआठवणींच्या, बिनकानाच्या, बिनकातडीच्या आउटिसचा यापैकी कशातही सहभाग नाही. तेव्हा मी काय किंवा योजनगंधेने काय, आपापली दाट ओळख विसरून जाऊन आउटिसची ओळख सांगावी ह्यात काहीसुद्धा हशील नाही. आउटिसचा मी कुणी लागत नाही. त्याला मोक्ष हवा असेल तर तो त्याचा प्रश्न आहे, माझा नाही.

**कृपाचार्य:** मीही तेच म्हणतो. आपण आउटिस आहोत असं अश्वत्थाम्याने वाटून घ्यावं अशी जर कृष्णाची इच्छा असेल तर तशी जाणीव त्यानेच अश्वत्थाम्यामध्ये निर्माण का नाही केली? त्याने जर जगातलं सगळं निर्माण केलं असेल तर हे त्याला का जमू नये? जी ओळख आपल्याला आपसूक जाणवत नाही ती पढवून कशी जाणवेल?

**अश्वत्थामा:** अगदी मान्य आहे. आणि त्यातूनही समजा मला मोक्ष मिळवावासा वाटलाच. आता आंबा राहू द्या, कारण तो मला कधी कुणी खायला दिलेला नाही. पण मला ऊस आवडतो. डोळ्यांना थांग लागणार नाही इतकी प्रचंड उसाची शेतं इथियोपियामध्ये असतात. एकेकाळी मी त्यांची वाटेल तशी नासधूस केलेली आहे. मोक्ष मिळवायचा तर हे जिभेचे चोचले मी बंद करायला हवेत. पण माझा प्रश्न असा आहे की जग निर्माण करताना ऊस चवीला इतका चांगला निर्माण केलाच का? ऊस खाऊन पोट भरेल आणि अंगात ताकद येईल, पण चवीला तो विशेष चांगला लागणार नाही अशी व्यवस्था आधीपासूनच का नाही केली? जर समुद्र दिसायला सुंदर नसता किंवा ऊस चवीला चांगला नसता तर मोक्ष जास्त सोपा झाला नसता का?

**मयाहुर:** मी तर ह्याच्याही पुढे जाईन. मुळात माणसांच्या आणि प्राण्यांच्या अंगांमध्ये आत्मे बंदिस्त करून नंतर त्यांना मोक्षासाठी प्रयत्न करायला लावणं हा द्राविडी प्राणायाम कशासाठी? सगळ्या आत्म्यांना सुरवातीलाच मोक्ष देऊन टाकला असता तर ही वायफळ गुंतागुंत वाढलीच नसती.

**कृपाचार्य:** कृष्णाने जग निर्माण केलंही असेल कदाचित, पण खूप विचार करून ते केलेलं आहे असं म्हणवत नाही.

**कृतवर्मा:** ह्या मुद्द्यावरून मी तुझ्याशी वाद घालेन अशी अपेक्षा धरू नकोस.

**मयाहुर:** पण मुद्दलात ह्या ठिकाणी आपण कसे येऊन पोहोचलो ते तरी पाहा. अर्जुन म्हणत होता की राज्य मिळवण्यासाठी मी स्वतःच्या चुलतभावांना मारणार नाही. आता कुणी म्हणेल की मारायला हरकत नाही, तर कुणी म्हणेल की हरकत आहे. हा पेच अवघड आहे. पण त्यांना मारलं तरी त्यांचे आत्मे मरत नाहीत असं म्हणून तो सुटायला थोडीदेखील मदत होत नाही. तेव्हा आत्म्याकडे नेणाऱ्या ह्या आडरस्त्याला लागून आपल्याला काहीही मिळालेलं नाही. तिथे जायला नको होतं.

**संजय:** तिथे काही मिळेल अशी हमी मी दिलेली नव्हती.

**कृतवर्मा:** हे कबूलच आहे. आम्ही तुझ्यावर रागावलो आहोत असं समजू नकोस. तुझं स्वतःचं यात काही नाही.

**संजय:** ते एक राहू द्या. आत्मा नको तर नको, पण आणखीही एक वेगळं कारण कृष्णाने सांगितलं होतं, तेसुद्धा तुम्हाला सांगतो. नंतर तुमची तक्रार येऊ नये.

**कृतवर्मा:** हा माणूस प्रश्नाचे लचके तोडतो. थेट गळा पकडत नाही.

**सीनू** (संजयला): तो तुला उद्देशून म्हणत नाहीय. कृष्णाला उद्देशून म्हणतो आहे.

**संजय:** ठाऊक आहे.

**सीनू:** मग पुढे सांग.

**संजय:** कृष्णाने जेव्हा जगातली माणसं निर्माण केली तेव्हा त्यांच्या जाती पाडल्या. प्रत्येक जातीला तिचं काम नेमून दिलेलं आहे. क्षत्रिय, शूद्र, ब्राह्मण आणि वैश्य अशा त्या चार जाती आहेत. अर्जुनाची जात क्षत्रिय अशी आहे, आणि युद्ध करणं हे क्षत्रिय जातीच्या माणसाला नेमून दिलेलं काम आहे. पण युद्ध करायचं तर माणसं मारावी लागणारच, मग ते चुलतभाऊ असोत की आणखी कुणी असोत. म्हणूनच अर्जुनाने न कुरकुरता ते करायला हवं. नाहीतर त्याची नाचक्की होईल.

**कृपाचार्य:** बाकीच्यांची कामं काय आहेत?

**संजय:** मालाची खरेदीविक्री हे वैश्यांचं काम आहे. माणसांची लग्नं लावून देणं आणि नंतर त्यांना झालेल्या मुलांना शिकवणं हे ब्राह्मणांचं काम आहे. शूद्रांची कामं खूप वेगवेगळ्या प्रकारची आहेत. कृतवर्मा मघाशी म्हणाला होता की हत्तीघोड्यांनी खूप घाण करून ठेवली आहे. ही घाण काढून नाल्यात सोडून देणं हे शूद्रांचं काम आहे. किंवा सैनिक मेल्यावर त्यांना जाळणं हेही शूद्रांचंच काम आहे. कुठल्या कामात कोण चांगला आहे हे पाहून त्याची जात ठरवलेली असते. उदाहरणार्थ, हा शेणामुताचा वास कृतवर्म्याला फार त्रासदायक वाटला होता, पण शूद्रांना तो तसा वाटत नाही. त्यामुळे किळस न येता स्वच्छतेचं काम ते करू शकतात. किंवा सीनू जात्याच बेरकी असल्यामुळे खरेदीविक्रीचं काम चांगलं करू शकते. अशी ही योजना आहे.

**कृतवर्मा:** कौरवसैनिकांची जात काय आहे?

**संजय:** अर्थात क्षत्रियच. तेव्हा अर्जुनाच्या उलट्या बाजूने युद्ध करणं हे त्यांचंसुद्धा काम आहे.

**कृपाचार्य:** पण कौरव मरणार हे कृष्णाने आधीच ठरवलेलं आहे, म्हणजे ही दोन्हीकडची कामं लुटूपुटूचीच आहेत.

**संजय:** हो, तसं म्हणायला हरकत नाही. नाटकात एका पात्राला भोसकण्याचं काम दुसऱ्या पात्राला द्यावं आणि धुळीत विव्हळत लोळत पडायचं काम पहिल्या पात्राला द्यावं तसं ते आहे.

**कृतवर्मा:** पण मग मघाचाच प्रश्न पुन्हा विचारतो. असं असेल तर कृष्णाने पांडवांतर्फे कौरवांकडे येऊन शिष्टाई केली ती कशासाठी?

**कृपाचार्य:** तोही नाटकाचाच भाग असावा. आणि युद्ध संपल्यानंतर कुरुकुलाची जी पडझड होईल आणि बायकांना माज येऊन वर्णसंकर होईल, तोही नाटकाचाच भाग असावा.

**कृतवर्मा:** पण मग नाटकात काय होणार हे आधीच ठरून गेलेलं आहे की त्यात बदल करण्याचा काही मार्ग शिल्लक आहे?

**संजय:** माहित नाही.

**मयाहुर:** थांबा. तुम्ही उगीच भरकटत चालला आहात. हे सगळं नाटक आहे असं कृष्ण स्वत: म्हणाला आहे का?

**संजय:** स्पष्ट शब्दांत तसं नाही म्हणालेला.

**मयाहुर:** मग आपण तसं समजूया नको. कारण तसं जर असतं तर क्षत्रिय जातीचं काम अमुक आहे ह्याला काही अर्थ उरला नसता. नट हीच प्रत्येकाची जात असती.

**संजय:** तेही बरोबर आहे.

**अश्वत्थामा:** माझी जात काय आहे?

**संजय:** प्राण्यांना जात असते का ह्यावर कृष्ण काही बोललेला नाही. कदाचित माणसांच्या जाती प्राण्यांना तशाच्या तशा लागू होत नसतील. हत्ती हीच तुझी जात असू शकेल.

**अश्वत्थामा:** पण मी नूबियातला हत्ती आहे. भारतातल्या हत्तींची जात माझ्याहून वेगळी असणार. नाहीतर मी त्यांच्यापेक्षा वेगळा दिसलो नसतो.

**संजय:** असेलही तसं. नक्की ठाऊक नाही, पण माणूस काय किंवा प्राणी काय, त्याची जात काही वेळा त्याच्या अंगाकडे बघून कळते आणि काही वेळा नाही. ती नेमकी ओळखणं अवघडच दिसतं. पण आपल्या आईवडिलांची जात ती आपली जात असं सोपं समजून चालायला हरकत नाही. माझे वडिल भाट होते आणि आई त्यांना सोबत करत असे. मीही तेच करतो.

**अश्वत्थामा:** पण असं असेल तर मला नेमून दिलेलं काम कुठलं हे कळत नाही. कारण माझे आईबाबा काम असं काहीच करत नसत. दोघेही खुशालचेंडू होते. त्यामानाने कामाचा अनुभव मला खूप आहे.

**संजय:** तुला नेमून दिलेलं काम कुठलं हे मलाही सांगता यायचं नाही. माणसांची सेवा करणं असं ते नसावं.

कारण नाहीतर तू जन्मापासूनच माणसांच्या ताब्यात असशील अशी व्यवस्था कृष्णाने केली असती. पण तसं झालेलं नाही.

**अश्वत्थामा:** नाही. तसं झालेलं नाही.

**मयाहुर:** पण हा नेमून दिलेल्या कामाचा मुद्दा आधीच्या मुद्द्याशी मेळ खात नाही. कसं ते सांगतो. अर्जुनाची जात क्षत्रिय आहे, आणि त्याला नेमून दिलेलं काम माणसं मारायचं आहे. तेव्हा त्याबद्दल त्याने उगीच शंकाकुशंका काढू नयेत असं कृष्णाचं म्हणणं.

**संजय:** बरोबर.

**मयाहुर:** पण कृष्णाचं हेही म्हणणं होतं की आत्मा मरत नसल्यामुळे माणसं मारण्यात वाईट काही नाही. पण असं असेल तर अर्जुन क्षत्रिय आहे की नाही हा मुद्दा गैरलागू आहे. माणसं मारण्याचं काम वैश्याने केलं तरीदेखील त्यात वाईट काही नाही. आणि याउलट माणसं मारणं जर वाईट असेल तर अर्जुनाला ते काम मुळात नेमून द्यायलाच नको होतं.

**संजय:** आता यावर मी काय बोलणार? काम ज्याने नेमून दिलं त्याला विचारायला हवं. पण ते काही जरी असलं तरी नेमून दिलेलं काम आपण करावं एवढ्यावर हे प्रकरण संपत नाही. तुम्हाला मोक्ष हवा असेल तर कामातून काही निश्चित फायदा व्हावा अशी अपेक्षा न ठेवता ते करावं लागतं.

**मयाहुर:** पण अर्थात मोक्ष हवा की नाही किंवा कशाला हवा हे वेगळेच प्रश्न आहेत. ते आपल्याला सुटलेले नाहीत.

**सीनू:** नाहीत सुटलेले. पण समजा ते सुटले, आणि मी ठरवलं की आपण मोक्ष मिळवायचा. तरीदेखील माझं काम करत असताना किमान इतका फायदा आपल्याला व्हायला हवा अशी अपेक्षा जर मी ठेवत गेले नाही तर ते होणार नाही. मी तुम्हाला म्हणाले होते की अफू बख्तरमधून आणावी लागते. इतक्या मणाच्या बदल्यात इतकी चांदी असा भाव सांगतात. तिथले शेतकरी लुच्चे आहेत. तागडीत मारतात. हिशेबात तसं धरूनच चालावं लागतं. अफूत डिंक मिसळावा लागतो, नाहीतर वड्या नीट पडत नाहीत. किती अफूला किती डिंक याचा हिशेब काटेकोर करावा लागतो. उंट हाकणाऱ्यांना वड्या चाराव्या लागतात. अध्येमध्ये बड्या माणसांना फुकट द्याव्या लागतात. एका वडीमागे मला जितका खर्च येतो त्याच्यापेक्षा जास्त भावाने

ती विकावी लागते. तसं नाही केलं तर माझा धंदा बसेल. एकदा माझ्याकडचे पैसे संपले की पुढे यातलं काहीच करता यायचं नाही. तेव्हा किती फायदा व्हायला हवा याचा हिशेब आधी न करून चालायचं नाही. नाहीतर मला मोक्ष मिळेल, पण इतरांना अफू मिळायची बंद होईल. मग तेच म्हणतील की मोक्षाच्या मागे लागून तू आमची गैरसोय केलीस.

**संजय:** हे सुख आणि दु:खासारखंच असावं. म्हणजे फायदा किंवा तोटा होत नाही तोवर ते वेगवेगळे समजायचे, पण एकदा यापैकी काहीतरी झाल्यावर ते सारखेच समजायचे. फायद्याची अपेक्षा ठेवायची नाही याचा अर्थ हा.

**सीनू:** पण तसं नाही. तोटा झाल्यावर जर मला दु:ख झालं नाही, तर हिशेबात कुठे गफलत झाली किंवा बाजारातला कुठला अंदाज चुकला हे शोधायला मी जाणार नाही. त्यामुळे माझं धंद्यातलं कसब सुधारणार नाही. ते जर सुधारायचं तर अपेश आल्याबद्दल थोडं तरी वाईट वाटायलाच हवं. गांधारात पिढ्यानपिढ्या हे अफूचं काम चालतं. त्यांचंही तसंच आहे. वाईट अफू आणि चांगली अफू ते सारखीच समजून चालले असते तर आत्ताइतकी तिची प्रत सुधारली नसती. मग तुम्हाला वाट्टेल ते खावं लागलं असतं.

**कृपाचार्य:** तुझं बरोबर आहे. काही वस्तू ह्या चांगल्या प्रतीच्याच असायला हव्यात.

**मयाहुर:** काम काय आहे त्यावर बहुतेक हे सगळं अवलंबून आहे. पण संजय जे म्हणतो ते मला अगदीच पटत नाही असं नाही. माझाही एक अनुभव मांडतो. लंबवर्तुळाचं क्षेत्र कसं काढतात ते तुम्हाला सांगितलं. मोठा व्यास, छोटा व्यास आणि तीनशे पंचावन्न यांचा गुणाकार करायचा आणि चारशे बावन्नने भागायचं. सोपं सूत्र आहे. यवनांना ते खूप आधीपासून माहित होतं. पण आता समजा आपल्याला लंबवर्तुळाचं क्षेत्र काढायचं नाही, तर कड किती लांब असते हे काढायचं आहे. त्याला परिमिती म्हणतात. गंमत अशी की लंबवर्तुळाची परिमिती किती असते याचं सूत्र कुणालाही माहित नव्हतं. यवनांमध्ये यावर खूप उलटसुलट चर्चा चालत असत. एकाच्या मते अमुक सूत्र बरोबर आहे, दुसऱ्याच्या मते दुसरं आहे असं त्रांगडं होतं. पण ही सूत्रं अचूक कधी नसायची. ती वापरून उत्तरं अदमासे बरोबर येत असत, पण थोडी ना थोडी चूक रहातच असे. काही वेळा उत्तर थोडं जास्त तर काही वेळा थोडं कमी येत असे. हे कुणालाच नीट समजत नव्हतं, पण इथे बरंच पाणी मुरतं आहे अशी शंका बळावत चालली होती. हा प्रश्न मी सोडवायला घेतला. तो हत्ती आहे असं समजून त्याचा सगळीकडून विचार केला, पण आपल्याला काय सापडायला हवं याबद्दल निश्चित अपेक्षा अशी मुद्दामच ठेवली नाही. मनात पूर्वग्रह न बाळगता गणित जिथे नेईल तिथे गेलो. खूप श्रम घेतले. शेवटी मी असं सिद्ध केलं की लंबवर्तुळाची परिमिती काढण्यासाठी अचूक सूत्र अस्तित्वात

नाही. आणि हे सिद्ध करत असताना जे नव्या प्रकारचं गणित माझ्यासमोर आपोआप उलगडत गेलं ते अतिशय घाटदार होतं. तेव्हा मला वाटतं असं की निश्चित अपेक्षा न ठेवता काम करत गेलो हे चांगलं झालं. जंगलात रानडुकराच्या पाठीमागे लागतात तसा एकच एक हव्यास धरून अचूक सूत्राच्या पाठीमागे लागलो असतो, तर सूत्रही सापडलं नसतं आणि ह्या खुसखुशीत नव्या गणिताचा शोधही लागला नसता.

**कृपाचार्य:** हे पटण्यासारखं आहे.

**कृतवर्मा:** सीनूचंही बरोबर आहे आणि मयाहुराचंही बरोबर आहे. काम काय आहे त्यावर ते अवलंबून आहे. मी म्हणेन की फायद्याची अपेक्षा न ठेवता काम करा हा एक सल्ला आहे. जी परिस्थिती तुमच्यासमोर असेल तिला हत्ती समजा, आणि हा सल्ला लागू आहे की गैरलागू हे तुमचं तुम्ही ठरवा. मोक्षाशी ह्या कशाचा काही संबंध नाही. मोक्ष नको असेल तरीसुद्धा सल्ला म्हणून तो शिल्लक राहतोच.

**कृपाचार्य:** कृष्णाच्या म्हणण्याचा असा अर्थ करता येईल का याबद्दल मला शंका आहे, पण विपर्यासच जर करायचा तर असा करायला हरकत नाही.

**सीनू** (मयाहुराला उद्देशून): तू गणिताचं तेवढं सांगितलंस. त्यापुढचा भाग मला माहित आहे, पण इतरांना सांगितलेला नाहीस.

**मयाहुर:** सांगण्यासारखं फार नाही.

**सीनू:** पण तरीही सांगूनच टाक.

**मयाहुर:** सांगतो. दडवण्यासारखंही त्यात काही नाही. मला जे काही शोध लागत गेले ते मी यवनांच्या पद्धतीप्रमाणे चामड्याच्या तुकड्यांवर लिहून ठेवले होते. त्याखेरीज मी जमवलेली कितीतरी पुस्तकं माझ्याजवळ होती. अथेनाईमध्ये एक हुशार माणूस होऊन गेला. नायक आणि नायिका शेवटी सुखी होतात असं नाटक जर लिहायचं असेल तर ते चांगलं कसं लिहावं ह्यावर त्याचं पुस्तक आहे. त्याचीही प्रत होती. यवनांचं नाटक इथल्यापेक्षा वेगळं असतं. तेव्हा मी खांडववनात राहात होतो. तिथेच हे सगळं होतं. अर्जुन आणि त्याचे भाऊ यांनी ठरवलं की त्यांना ती जागा गाव वसवायला हवी आहे. एक दिवस कुणाला काही न सांगता त्यांनी रानाला आग लावली. माझं सगळं त्यात गेलं. अंगाचा डावा भाग आणि चेहरा खूप भाजला पण जीव वाचला. पण नुकतंच मला हे समजलं की माझ्या आत्म्याला मात्र आगीमुळे काही इजा

झालेली नाही. तेवढी एक बातमी चांगली आहे.

**कृपाचार्य:** जे गेलं ते नंतर पुन्हा लिहून काढलंस का?

**मयाहुर:** नाही. मी शोधलेलं गणित बरोबर असेल तर कुणाला तरी ते पुन्हा सापडेलच. आणि नसेल तर जळलेलंच बरं.

**सीनू:** विक्षिप्त माणूस आहेस.

**कृतवर्मा:** तो विक्षिप्त असेल, पण कुणाच्या अध्यात नाही की मध्यात नाही असं त्याचं काम असतं. अर्जुनाचं तसं नाही. त्याला नेमून दिलेलं काम माणसं मारण्याचं आहे, तेव्हा ते तू निमूटपणे कर इतकं सांगणं पुरेसं वाटत नाही.

**मयाहुर:** हे कबूल आहे. तुझं काम निमूटपणे कर असं मीच स्वत:ला सतत सांगत असतो. पण अर्जुनाचं तसं नाही.

**कृतवर्मा:** हे युद्ध कसं आहे ते पाहा. धैर्यधर आणि शूरसेन हे दोघेही क्षत्रिय आहेत आणि एकमेकांना मारण्याचं काम त्यांना नेमून दिलेलं आहे. हे जर त्यांनी निमूटपणे केलं तर दोघांनाही इजा होईल. याउलट त्यांनी हे करायचं नाकारलं तर दोघेही आनंदाने घरी जाऊ शकतील.

**अश्वत्थामा:** म्हणजे पुन्हा निष्कर्ष हाच निघतो की जग निर्माण करताना नीट विचार केलेला नाही. हा संशय मला फार पूर्वीपासून आहे. तुम्ही एकदा नूबियामध्ये येऊन पाहा. मोजता येणार नाहीत इतके कावळे आणि मोजता येणार नाहीत इतकी घुबडं तिथे एकाच टापूत राहतात. एकमेकांचा प्रचंड दुस्वास करतात. कावळ्यांना दिवसा दिसतं पण रात्री नाही आणि घुबडांना रात्री दिसतं पण दिवसा नाही. दुपार झाली की कावळे जमा होतात आणि एकट्या पडलेल्या घुबडाला शोधून काढून घेराव घालून चोचींनी त्याचं रक्त बाहेर काढतात. याचा सूड घुबड मध्यरात्री घेतं. झाडाच्या फांदीवर रांगेने झोपलेल्या कावळ्यांवर झडप टाकून त्यांची डोकी फाडून ते आतला मेंदू बाहेर काढतं. दोन्ही जाती नेमून दिलेली कामं करतात. ती नेमून दिलेली असणार हे उघड आहे, कारण घुबडांचे आणि कावळ्यांचे आईबाप अगदी हेच करत होते. पण ती एकमेकांच्या जिवावर उठून करतात, आणि म्हणूनच मी म्हणतो की ही अख्खी योजना वेडेपणाची आहे. दोघे एके ठिकाणी राहणार नाहीत याची जग निर्माण करतानाच सोय बघायला हवी होती. निदान त्यांना

एकत्र का आणलं हे शांतपणे समजावून द्यायला हवं होतं. यातलं काहीच केलेलं नाही.

**कृपाचार्य:** घुबड हुशार असतं.

**कृतवर्मा:** मी असं म्हणणार नाही, कारण ते फक्त नेमून दिलेलं काम करतं. पण घुबडापासून माणसानं काही शिकणं ह्याला मात्र मी हुशारी म्हणेन. (कृपाचार्याकडे रोखून पाहतो.)

**कृपाचार्य:** (थोड्या वेळाने) विचार करण्यासारखी बाब आहे. पण पाचवा नियम?

(कृतवर्मा जिवणीला मुरड घालून हसतो. आपली स्वत:ची हसण्याची उबळ दाबून धरून कृपाचार्य त्याला प्रत्युत्तर देतो. हे दोघे काहीतरी खाजगी बोलत असल्याचं इतरांच्या लक्षात येतं, पण विचारायला कुणी धजत नाही.)

**कृतवर्मा:** (सावरून बसत) मयाहुरा, तू काही म्हणण्याच्या बेतात होतास.

**मयाहुर:** खरं तर नव्हतो, पण म्हणून टाकतो. कदाचित आपण कृष्णावर अनाठायी टीका करत असू. जग निर्माण करताना त्याने अमुकअमुक करायला हवं होतं अशा पठडीतल्या आपल्या तक्रारी आहेत. पण त्याने ते निर्माण केलेलं आहे असं मला वाटत नाही.

**कृपाचार्य:** तसं फक्त वादाखातर गृहीत धरावं असं मी म्हणालोच होतो.

**मयाहुर:** जे काही तो म्हणतो आहे त्यातल्या कितीतरी बाबींची संगती लागत नाही. त्याने जर खरोखरीच जग निर्माण केलं असतं तर जगाची रचना आहे तशी का आहे यामागचं सुसंगत स्पष्टीकरण त्याला देता आलं असतं. पण त्याने ते आपल्याला दिलेलं नाही.

**कृतवर्मा:** कदाचित त्याला ते द्यायचं नसेल.

**कृपाचार्य:** पण मग आम्ही त्याचे चेले बनावं अशी अपेक्षा धरू नये.

**मयाहुर:** बऱ्याच गोष्टी जुळत नाहीत. मी तुम्हाला मघाशी म्हणालो होतो की फिलेस्तानमध्ये एक तरुण

माणूस होता, आणि तो गोष्टी सांगत फिरत असे. आपल्या बापाचं नाव याह्वे असं तो सांगत असे, पण ह्या बापाला तिथे कुणीच पाहिलेला नाही. फिलेस्तानमधल्या लोकांची अशी समजूत आहे की जग याह्वेने निर्माण केलं. त्यांच्या पुस्तकात तसं तपशीलवार लिहिलेलं आहे. तिथल्या लोकांना कृष्ण माहित नाही, आणि इथल्या लोकांना याह्वे माहित नाही. शिवाय जगाची रचना अशी आहे की दोघाजणांनी एकमेकांना कळू न देता ते अर्धवट निर्माण करणं शक्य नाही. कारण तसं असतं तर फिलेस्तानमधले डोंगर इथल्यापेक्षा अगदी वेगळे असते, किंवा तिथल्या पाण्याची चव इथल्यापेक्षा अगदी वेगळी असती. पण तसं नाही. तेव्हा काहीतरी गोंधळ आहे. कृष्ण आणि याह्वे यापैकी किमान एकजण खोटं बोलतो आहे हे नक्की.

**कृपाचार्य:** अशीही शक्यता आहे की याह्वेने कृष्णाला निर्माण केलं असेल, पण ही गोष्ट त्याला भारतातल्या लोकांना कळू द्यायची नसेल. का ते माहित नाही. अर्थात ह्याच्या उलटही असू शकेल. कृष्णाने कदाचित याह्वेला निर्माण केलं असेल, पण ही गोष्ट त्याला फिलेस्तानमधल्या लोकांना कळू द्यायची नसेल.

**कृतवर्मा:** किंवा ह्या दोघांमागचा सूत्रधार वेगळाच असू शकेल. जग कसं असायला हवं ह्याचा आराखडा तयार करून याह्वे आणि कृष्ण ह्या दोघांना जगाच्या वेगवेगळया भागांत तो अंमलात आणायला त्याने सांगितला असेल. आपण नामानिराळे राहावं अशीच त्याची इच्छा असेल. याह्वे फिलेस्तानमध्ये सांगतो की जग मी निर्माण केलं आणि कृष्ण भारतात सांगतो की जग मी निर्माण केलं. दोघेही अर्धसत्य सांगताहेत, पण आपापल्या जागी त्यांची प्रतिष्ठा टिकून राहावी म्हणून सूत्रधार कदाचित हे खपवून घेत असेल.

**मयाहुर:** याह्वेने लिहिलेलं पुस्तक वरवर जरी वाचलं तरी हे लगेच कळतं की स्वत:चं कौतुक करून घ्यायची त्याला मोठी हौस आहे. कृष्णाचाही स्वभाव यापेक्षा फार वेगळा दिसत नाही. तेव्हा तू म्हणतोस ते शक्य आहे. आणि एकदा ह्या दिशेने विचार सुरू केला की काही परस्परसंबंध आपोआप लक्षात येत जातात. संजय मघाशी म्हणाला की कृष्णाने सूर्याला योग शिकवला आणि सूर्याने मनूला शिकवला. योग म्हणजे काय ते मला ठाऊक नाही आणि सूर्याचा इथे संबंध काय हेही ठाऊक नाही. पण ते महत्त्वाचं नाही. काही जरी असलं तरी मनू हा कृष्णाचा चेला आहे इतकं यावरून उघड होतं. ह्या मनूबद्दल मला थोडीफार माहिती आहे. असं सांगतात की एकेकाळी खूप मोठा पूर आला आणि सगळी माणसं बुडून मेली. त्यावेळी मनूने एक गलबत तयार करवून घेतलं आणि एका देवमाशाच्या शिंगाला ते दोरखंडाने बांधून पुरातून तरून नेलं. पूर ओसरल्यानंतर पाण्यातून बाहेर आलेल्या एका अप्सरेला तो जुगला. त्यातून पुन्हा माणसं जन्माला आली. आता नवलाची गोष्ट अशी की फिलेस्तानमध्ये नोहा नावाचा एक याह्वेचा चेला होता. त्यानेही एक गलबत तयार करवून घेतलं आणि पूर ओसरल्यानंतर तशीच पुन्हा माणसं जन्माला घातली.

तेव्हा तर्क असा करता येतो की फिलेस्तानपासून भारतापर्यंत व्याप्ती असणारा एकच मोठा पूर आला असणार. ह्या दोघांनीही तो आपापलं अवडंबर माजवण्यासाठी वापरून घेतला. भारतातल्या माणसांना वाटतं की आपण कृष्णाच्या चेल्याची मुलं आहोत आणि फिलेस्तानमधल्या माणसांना वाटतं की आपण याहवेच्या चेल्याची मुलं आहोत. इकडचा पत्ता तिकडे नाही.

**सीनू:** पण असं असेल तर ह्या सूत्रधाराने फिलेस्तानातून भारतात यायला रस्ता ठेवायला नको होता. तसा तो ठेवल्यामुळेच हे गुपीत उघड झालं.

**मयाहुर:** कदाचित हा रस्ता मूळ आराखड्याचा भाग नसेलही. नंतर कुणीतरी तो काढला असू शकेल. आपण म्हणतो आहोत की जग निर्माण करण्याचं काम एका सूत्रधाराने दोघांना वाटून दिलं असेल. ढोबळ कल्पना म्हणून हे ठीक आहे, पण अर्थात ते दोघे नव्हेत तर अनेकजण असावेत. कारण उदाहरणार्थ चीनमध्ये कुणी याहवेचं नाव ऐकलेलं नाही आणि कृष्णाचंही नाही.

**कृपाचार्य:** पण हा आराखडा किती जुना आहे हेही आपल्याला माहित नाही. त्यामुळे हा सूत्रधार आज जिवंत असेलच असं खात्रीने म्हणवत नाही. मध्ये केव्हातरी तो मेला असू शकेल. आणि एकदा त्याचा प्रभाव मागे पडल्यानंतर इतरांनी आपापल्या बुद्धीने जगाच्या रचनेत फेरफार केले असंही शक्य आहे.

**कृतवर्मा:** पण असं असेल तर काय करायचं हे ठरवणं फार अवघड आहे. कारण कुठल्या बाबतीत कुणाकडे जबाबदारी आहे याबद्दल निश्चित काही समजत नाही.

**सीनू:** अजून किती वेळ राहिला आहे?

**संजय:** सतरावा अध्याय संपत आला आहे. अठराचा आपला अदमास बरोबर असेल तर आता हे लवकरच आटपेल. पण कृतवर्म्याचा सल्ला कृष्णाने मानलेला दिसतो. नुकताच तो म्हणाला की माणसांचे तीन प्रकार पडतात. ताजं खाणारे, शिळं खाणारे, आणि तेलकटतिखट खाणारे. आपल्यापैकी कोण कुठल्या वर्गात मोडतो ह्यावर चर्चा घडवून आणता येईल.

**कृतवर्मा:** नको. मनोरंजन करून घेण्याची वेळ आता मागे पडलेली आहे.

**कृपाचार्य:** पण पुढचं ठरवायला हवं.

**सीनू:** मला एक शंका येतेय ती बोलून दाखवते. मग मला तर्कटी म्हणा, काही म्हणा.

**कृपाचार्य:** बोल.

**सीनू:** अर्जुन भेदरट आहे आणि मनाने डळमळीत आहे. शिवाय कृष्णासमोर तो आता पुरता गयाळ होऊन गेलेला आहे. पण मी म्हणते की तो बुद्धीने मंद नाही. आपल्याला पडलेले प्रश्न त्यालाही पडले असणार, पण कृष्णाला ते समोरासमोर विचारायचा त्याला धीर होत नसावा.

**कृतवर्मा:** पण मग यावर आम्ही काय करणार?

**सीनू:** सांगते. संजयला जो वर मिळालेला आहे त्याबद्दल अर्जुनाला ठाऊक असणार.

**संजय:** हो, ठाऊक आहे.

**सीनू:** म्हणजे अर्जुनाला हा अंदाज असणार की आपलं आणि कृष्णाचं संभाषण खाजगी नाही. कृष्ण जे म्हणतो आहे त्याचा नीट अर्थ त्यालाही लागत नसावा. तेव्हा संजयने हे सगळं ऐकून इतरांना सांगावं अशी त्याचीही इच्छा म्हणा किंवा अपेक्षा म्हणा, पण असावी. मुखदुर्बळ असल्यामुळे तो स्वत: काही करू शकत नाही. पण इतरांनी आपल्या ह्या बिकट अवस्थेची दखल घ्यावी आणि योग्य वाटेल ते करावं अशी एक कळकळ त्याच्या मनात असणार. माझा तर्क मी थोडा ताणते आहे, पण हे अगदीच अशक्य वाटत नाही.

**कृपाचार्य:** नाही, अशक्य मुळीच वाटत नाही.

**कृतवर्मा:** मी एक सुचवतो. सगळे धैर्यधर आणि सगळे शूरसेन इथेच आपल्याभोवताली आहेत. त्यांना गटागटाने एकत्र आणता येईल. एकूण परिस्थिती समजावून देऊन युद्ध करायचं की नाही हे आता तुम्हीच ठरवा असं सौम्य शब्दांत आपल्याला म्हणता येईल. त्यांचा कल काय होतो हे पाहून पुढचं ठरवता येईल.

**सीनू:** कल्पना चांगली आहे. मी आणि मयाहुर इथून केव्हाही बाहेर पडू शकतो. पण तुमची काळजी वाटते.

**अश्वत्थामा:** दोन्ही सैन्यांतले कितीतरी हत्ती माझ्या ओळखीचे आहेत. त्यांच्यापर्यंत निरोप पोहोचवण्याचं

काम माझ्याकडे लागलं. आणि हे एकदा झालं की घोड्यांनाही तो आपसूक कळेलच. ह्या चर्चेमध्ये त्यांचंही मत घेता येईल. पण तसं पाहिलं तर घोडे कधीच हत्तींच्या शब्दाबाहेर नसतात.

**मयाहुर:** कल्पना खरंच चांगली आहे. पण मला वाटतं की त्याआधी एक शेवटची संधी देऊन बघावी.

**कृपाचार्य:** कुणाला?

**मयाहुर:** ज्या कुणाच्या हाती अंतिम सूत्रं असतील त्याला. मग तो कृष्ण असो की आणखी कुणी असो. आपले प्रश्न त्याच्यापर्यंत पोहोचले असतील आणि उत्तरं त्याच्याकडे असतील तर ती त्याने आपल्याला कळवायला हवीत. नसतील तर इलाज नाही. म्हणजे पोहोचले नसतील तर किंवा उत्तरं नसतील तर किंवा असून द्यायची नसतील तर.

**कृतवर्मा:** माझी हरकत नाही.

**कृपाचार्य:** माझीही नाही.

**सीनू:** मग एक करून बघूया. (आपल्या गाड्यात जाते. तिथे शोधाशोध करून तालपत्रांची एक चळत आणि मघाचाच तांब्या घेऊन परत येते. चळत समोर ठेवते.) सगळी कोरी आहेत. माझ्याकडे नेहमी साठा असतो. इथे मी ही मांडलेली आहेत, लिही म्हणावं काय लिहायचं ते. उत्तरं बरोबर वाटली तर आपण लागलीच प्रती काढून घेऊ. (तांब्या मयाहुराकडे सोपवते.) किती वेळ द्यायचा?

(मयाहुर अश्वत्थाम्याच्या ढुंगणावर हाताने थापटतो, तसा अश्वत्थामा धार सोडू लागतो. मयाहुर ती तांब्यात भरून घेतो. तांब्याच्या तळाला असलेलं लहान भोक त्याने आपल्या तर्जनीने बंद केलं आहे. चळत मध्यभागी ठेवून तिच्याभोवती रिंगण करून सगळेजण उभे आहेत.)

**मयाहुर:** अठरा क्षण देऊया. त्याचा अठराचा आग्रह आम्ही पाळतो, आमचा उत्तरांचा आग्रह त्याने पाळावा. (तांब्याखालचं बोट बाजूला करून धार पडू देतो. आतल्या खुणांकडे तो बारीक लक्ष ठेवून आहे. 'अठरा क्षण' हा अवधी उत्कंठा ताणली जावी इतका मोठा आहे, पण कंटाळा यावा इतका मोठा नाही. रिंगणाभोवतालची गर्दी वाढते आहे. मयाहुर तांब्याखाली पुन्हा बोट धरतो तशी धार पडायची थांबते.) वेळ संपली.

(अश्वत्थामा पुढे होतो आणि एकेक पान आपल्या सोंडेने काळजीपूर्वक बाजूला करत जातो.)

**अश्वत्थामा:** (त्यांची पुन्हा व्यवस्थित चळत करून सोंडेने सीनूपुढे धरतो.) घे. सगळी कोरी आहेत.

(कृपाचार्य आणि कृतवर्मा एकमेकांकडे दीर्घकाळ पाहत राहतात.)

**सीनू:** मला नकोत ती आता.

**अश्वत्थामा:** ठीक आहे. (सोंड मागे घेऊन पानं तोंडात ठेवतो आणि चावून चावून खाऊन टाकतो.) माफ करा हं मंडळी! पण राहवत नाही. (शेणाचा पो टाकतो.)

(काहीसा लांब जाऊन मयाहुर तांब्या ओतून देतो आणि हाताची बोटं झाडत राहतो. भोवतालचे सैनिक अवघडून स्तब्ध उभे आहेत. 'मातर! मातर! तू कुठे आहेस? मातर!' अशा आरोळ्या दूरवरून येऊ लागतात. सीनू त्या दिशेला तोंड वळवते आणि उत्साहाने हात हलवत राहते.)

**सीनू:** माझी पोरगी इकडेच येते आहे. म्हणजे ह्या दोघांचं बोलणं संपलेलं दिसतंय.

**संजय:** हो, नुकतंच संपलं.

**कृपाचार्य:** कोण काय म्हणालं शेवटी?

**संजय:** अर्जुन म्हणाला की आता मी युद्धाला तयार आहे. काय करायचं ते मला नेमकं समजलं आहे आणि माझा गोंधळ नाहीसा झाला आहे.

**अश्वत्थामा:** माझा नाही.

